तंत्र्यामुळेच; नाही का ? ' बोलावयाचें लिहूं नये ' हेंच खरें ! पण त्यांच्या त्या वेळच्या विचारांचें दिग्दर्शन त्यांनी करून ठेवलें आहे. स्वातंत्र्याची पहाट होऊन उत्कर्षाचे दिवस केव्हा येतील असें ते म्हणतात. पण, **' किंवा तीतें आणायाचें कांही। यत्न आमुच्या होतिल काय कहीं ? '** हे उद्गार जास्त महत्त्वाचे वाटतात. केवळ कल्पना करून आणि काव्य लिहून त्यांचें समाधान होत नव्हतें, हें यावरून स्पष्ट दिसतें. किंवा, त्यांच्या कल्पनांचे उद्रेक हे जिवंत असल्या-कारणाने प्रत्यक्ष कार्याचा विचार त्यांच्या मनांत आला नसता तरच नवल ! त्यांच्या मनांत जो काळोख पडलेला दिसतो, त्याला सामाजिक आणि राजकीय दुःखें हीं राहू-केतूंच्या जोडीप्रमाणे कारणीभूत आहेत. त्यांच्या पुढील आयुष्यांत जी निराशा पुनः पुनः दिसते तिचें कारण, आपल्या हातून असे प्रयत्न आपल्या अपेक्षेइतके, आपल्या यौवनाच्या भरांतील पहिल्या स्वप्नांइतके, होऊं शकले नाहीत याची जाणीव हेंहि असेल, हें यामुळे मनांत आल्यावाचून राहत नाही. आकाशांतील नक्षत्रें पृथ्वीवर आणायचें त्यांचें स्वप्न होतें ! अशांच्या हातीं काय पडणार, असें कुणाला वाटेल. पण कवींचा तो स्वभावच असतो. आणि या त्यांच्या स्वभावामुळेच जगाला कांही वेगळ्या, उंच वातावरणांतल्या गोष्टींचा लाभ होत असतो !

जें जें उत्कट आणि भव्य असेल तें घ्यावें, हा तर कवींचा स्वभावच असल्याने केशवसुतांची दृष्टि इतिहासाकडे वळणें हें साहजिकच होतें. पण पारतंत्र्याच्या दुःखामुळे त्यांची ही दृष्टि अधिक भेदक झाली. इतिहासाकडे केशवसुत वळले ते त्यांतून स्फूर्ति मिळविण्यासाठी. ' नैॠत्येकडला वारा ' आल्यावर त्यांच्या अंतःचक्षूंसमोर सह्याद्रि उभा राहिला !

**त्यांचे उंच शिरांवरी विलसती किल्ले मराठी जुने**
**देवी पालक त्यांतल्या मज पुनः धिक्कारिती भाषणें**
**' कोठें पूर्वज वीर धीर तव ! तूं कोणीकडे पामरा !**
**ये येथे इतिहासपत्र पडकें वाचून पाही जरा. '**

' हरहर ! महादेव ! ' हीच गर्जना त्यांच्या मनांत कां घुमत होती ? दुसऱ्या बाजीरावाची चीड त्यांना कां येत होती ? ' बाऊं बघतें नांव ल्याप्रत ' ही भीति त्यांच्या मनांत धस्स करीत होती; हें नांव म्हणजे ऐतिहासिक

कीर्तीच नव्हे काय ! राजकीय स्वातंत्र्याच्या आकांक्षेचा आढळ केशवसुतांच्या कवितेंत फार ठिकाणीं होत नाही, असा विचार जेव्हा मांडला जातो तेव्हा या दृष्टीने त्यांचें काव्य पाहणें आवश्यक आहे असें वाटतें. केवळ सामाजिक समजल्या गेलेल्या 'स्फूर्ति', 'तुतारी' इत्यादि कविताहि या दृष्टीने पुनः एकवार पाहिल्या पाहिजेत.

जगद्वंद्य विभूति मराठ्यांच्या इतिहासामध्ये आहेत हें कुणाहि सत्यप्रेमी निःपक्षपाती माणसाला मान्य होईल. केशवसुतांचें या इतिहासावर अगदी कवीसारखें प्रेम होतें यांत शंका नाही. पण त्यांची सखोल दृष्टि येथेच थांबत नाही. आणि तें बरोबरच आहे. महाराष्ट्राला तरी इतिहास घडविण्याची प्रेरणा कशी झाली ? रामायण, महाभारत आणि तत्सम प्राचीन काव्यग्रंथांतूनच ना ? एखादी व्यक्ति किंवा एखादें राष्ट्र जेव्हा महान् पराक्रम गाजवून दाखवतें, तेव्हा त्याचे स्वतःचे अंगचे गुणच त्याला कारण होतात हें खरें. पण जितक्या महान् परंपरेचा वारसा ती व्यक्ति किंवा तें राष्ट्र सांगत असेल तितक्या प्रमाणांत तिच्या अंगच्या गुणांची प्रभा अधिक विलसणार हेंहि खरेंच. आणि रामायण, महाभारत आदि ग्रंथांत तर मृत राष्ट्रालादेखील जिवंत करण्याची संजीवनी शक्ति आहे, याबद्दल दुमत होईल असें वाटत नाही. साहजिकच केशवसुतांना या ग्रंथांविषयी आकर्षण उत्पन्न झालें; आणि हीं काव्यें कुठे साकार दिसतील का, अशी काव्यात्म उत्सुकता त्यांच्या मनांत उत्पन्न झाली. आणि तसें एकदा घडलें ! तत्काळ त्यांची प्रतिभा बोलूं लागली—

**तीच मनोहारिणी ! – जी ठसलीसे मन्मनीं**
**ती युवती पद्मिनी – जी ठसलीसे मन्मनीं !**
**सौंदर्यें शालिन्यें पुतळी**
**ती रामायणमूर्तिच गमली**
**उदात्त मुद्रा, गंभीर चर्या**
**यांहीं भारत खचिता वर्या**
**ती रमणी सद्गुणी – जी ठसलीसे मन्मनीं !**

रामायण-महाभारताची साकार मूर्ति पाहण्याची ही कल्पना, त्यांची दृष्टि केवळ काल्पनिक मनोराज्यांत न गुंततां वास्तवांतच उदात्ततेचा शोध कशी घेत होती

याचें प्रमाण आहे. सत्य हें काव्यापेक्षा अधिक आकर्षक आहे,' असें अनेकदा वाटतें हें खरें. केशवसुतांनी आधुनिक मराठी काव्यांत प्रेमकाव्याचा प्रवाह निर्माण केला तो या प्रेमाचा होय, हें विसरतां कामा नये! केशवसुतांना रामायण-महाभारतासारखें प्रेम हवें होतें. रामायण-महाभारतांत शोभावी अशी व्यक्ति दिसल्यास कोणता बुद्धिमान माणूस तिची 'ध्यानधारणा' करणार नाही? केशवसुत तर कवीच होते! म्हणूनच 'वृक्षावरी वीज जधी पडावी' अशी त्यांची अवस्था झाली! साहजिकच, त्यांना आपण भूत झालों आहोंत असें कधी कधी वाटलें, तर कधी पुनः —

**कविच्या हृदयीं जसे गुंगती कवितेचे मधुबोल**
**किंवा गायकमतींत झुकती ताना त्या सुविलोल**
**तसे माझिया अन्तर्यामीं तुझिया सौंदर्याचे**
**विकास हसती सखे निरंतर, हृदयंगम जे साचे!**

असें वाटत राहिलें! प्रेमाविषयी ही श्रेष्ठ कल्पना असल्यानेच,

**प्रीतिविषय तो जर का परका प्राण्याला जाहला,**
**तयाचा जन्महेतु खुंटला!**

असे उद्गार त्यांनी काढले! असो.

केशवसुतांना त्या आर्यसंस्कृतिविषयी अत्यंत ओढ वाटत होती. म्हणून रा. रा. बळवंत आपाजी दाते यांचें देशप्रेमानें रसरसलेलें वक्तृत्व ऐकतांच केशवसुतांना 'माझिये जातीचें मज भेटो कोणी' ही इच्छा पूर्ण झाल्यासारखें वाटलें आणि ते म्हणाले,

**होती श्रेष्ठपदास आर्यजननी जी एकदा पावली**
**दुर्दैवें परि जी विपद्गणशतीं सध्या असे गांजिली**
**तीचें दुःख जरा तरी शमविण्या, आम्हांस या भूवरीं**
**ढाळायास सखेद लोचनजलें तूं धीर आज्ञा करी**
**"जैजैकार असो तुझा भरतभू!" हा घोष जेव्हा करूं**
**जैजैकारानि नामहि प्रिय तुझें दाते! तधीं आदरूं!**

थोरल्या बाजीरावांच्या मृत्यूची दुःखद आठवण होतांच ते लिहितात,

**निजनामाचा 'गाजी' ऐसा अर्थ उरवुनी तो गेला**
**तर हळहळली आर्यमाउली ऐकुनि त्याच्या निधनाला!**

रांगोळी घालणाऱ्या स्त्रीला तर ते 'आर्ये' असेंच पुनः पुनः संबोधतात. तीं आर्यसंस्कृतीचीं प्रतीकें पाहून

तीर्थे, देव, सती, मुनी, नरपती, देवी तशा पावना,
अन्तर्दृष्टिपुढूनिया सरकल्या, सन्तोष झाला मना !

असें ते म्हणतात. त्यांच्या समाधानाचें हें कारण मुद्दाम लक्षांत घेतलें पाहिजे. तीं प्रतीकें पाहून आर्यसंस्कृतीच्या ज्या वैशिष्ट्यांच्या मुद्रा त्यांच्या मनांवर ठसल्या त्या लगेच त्यांनी काव्यांकित केल्या.

आदित्यादिक आकृती सुचविती दिव्यत्व तें उज्ज्वल,
तैसें स्वस्तिक सूचवी सफलता धर्मार्थकामांतिल;
पावित्र्याप्रत गोष्पदें तुळसही, शोभेस हीं सारसें
पुष्पें प्रीतिस, चक्र हें सुचवितें द्वारीं हरी या असे !

आणि मग ही आर्यसंस्कृति जतन करणाऱ्या त्या स्त्रीविषयी अत्यंत आदरभाव उत्पन्न होऊन तिला ते ( काव्यांत ) म्हणतात,

तत्त्वें मंगल सर्वही विहरतीं स्वर्गीं तुझ्या या, अये
आर्ये ! तूं उपचारिकाच गमसी देवी तयांची स्वयें;
नातें स्नेह निदान ओळख जरी येथे मला आणिती,
होतों मी तर पाद सेवुनि तुझे रम्य स्थळीं या कृती !

केशवसुतांची स्त्रीविषयी ही भावना होती, आणि साध्या साध्या गोष्टींत त्यांना हा आशय आढळत होता ! केशवसुतांच्या स्त्रीविषयक भावनांचा विचार करणाऱ्यांना हें सत्य क्षणभरदेखील डोळ्यांआड करून चालणार नाही. तर, केशवसुतांच्या मतें हा आपला देश, ही भरतभू ही आर्यभूमि आहे. तें आर्यत्व येथे पुनः अवतीर्ण व्हावें, म्हणून ते त्याचें सतत चिंतन करीत आहेत असें वाटतें.

पण इतिहासाचा ठाव घेणारी त्यांची नजर आर्यकालापर्यंत जाऊन थांबत नाही. 'कुठे जातों मी', 'कोणीकडून कोणीकडे' इत्यादि मूलभूत प्रश्नांचा विचार करणाऱ्या या कवीची नजर इतिहासाच्याहि मुळांकडे जाते !

'दिवाळी' या कवितेंत ते म्हणतात,

जो गोपाळ गमे प्रभातसमयीं गाई वनीं चारितां,
वाटे रव्युदयीं नदीवर मुनी अर्घ्यास जो अर्पितां,
जो भासे दिवसां कृषीवल शिरीं खोंवूनिया लोंबरें,
तो आतां ऋतु शारदीय बहुधा शेतांतुनी संचरे.

हें जें त्यांच्या डोळ्यांपुढे उगवत्या सूर्याला अर्घ्यप्रदान करणाऱ्या ऋषीचें चित्र होतें, त्या ऋषीपुढे थेट जाऊन ते थांबतात !

आणि मग जेव्हा भानावर येऊन ते या पृथ्वीवर उतरतात तेव्हा अत्यंत उत्सुक होऊन आपल्या सर्व वृत्ति एकवटून ते म्हणतात,

सोमाचा रस वेदकाळच्या ऋषिवर्यांनी उकळीला
शेष तयाचा द्या तर लौकर पिपासु जे त्या आम्हांला !

केशवसुतांना तहान लागली आहे ती त्या सोमरसाची ! जितक्या हर्षभराने ते आद्य ऋषि उत्स्फूर्त गीतें गात गात सोमरस तयार करीत आणि अगदी सख्यत्वाने सगळ्या देवतांना आवाहन करून तो प्राशन करीत, तितक्या हर्ष-भरानेच केशवसुत ' द्या, द्या, आम्हांला तो विलक्षण सोमरस लौकर द्या ' असें म्हणत आहेत. कसलें तीव्र पेय हें ! पण तेंदेखील त्यांना पेला काठोकाठ भरून हवें आहे !

' काठोकाठ भरूं द्या पेला, फेस भराभर उसळूं द्या ' हें तर त्यांनी ध्रुवपदच केलें आहे !

कां ? केशवसुतांना सोमरसाची एवढी मोहिनी कां वाटते ? अशीं सोमरसाचीं वैशिष्ट्यें तरी कोणतीं ? केशवसुतांनाच समकालीन अशा इंग्रजी बंडखोर कवींत एक उत्तेजक पेय विशेष मान्यता पावलें होतें असें म्हणतात. जवळ ' विशेष ' व्यक्ति घेऊन एका हातांत कवितांची वही आणि दुसऱ्या हातांत उन्मादक पेयाचा पेला घेणारा फारसी कवीहि प्रसिद्ध आहे. केशवसुतांनाहि उष्णता उत्पन्न करणारें एक पेय हवें आहे ! आतांच उल्लेखिलेल्या या दोन उन्मादक पेयांत आणि केशवसुत मागत असलेल्या पेयांत कांही अंतर आहे की नाही ?

' नाही, कांहीहि नाही ! ' असें प्रसिद्ध टीकाकारांचें मत आहे ! प्रा. जोग म्हणतात, " स्फूर्तीला मद्य म्हणण्याची कल्पना आपल्याइकडची नाही. निदान असल्यास तें मद्य नसून सोमरस असावा. सोमाचा उल्लेख केशव-

सुतांनी केलाच आहे. पण ते स्वतः मद्यांत आणि सोमांत फरक करीत नाहीत असें दिसतें. स्फूर्तिरूपी हें मद्य सदैव वटवट करण्याचें ( उपदेश करण्याचें ) नशिबीं असलेल्या कवि-लेखक लोकांनी घेतल्यास त्यांना स्वतःला क्षणोक्षणीं जगाचे नवनवे रंग दिसूं लागतील; ..." इत्यादि. पण मद्य आणि सोमरस यांत अक्षरशः जमीनअस्मानाचें अंतर आहे हें वेदवाङ्मयाकडे नुसतें वळून पाहिलें तरी दिसल्याशिवाय राहत नाही. हें पाश्चात्य लेखकांनाहि माहीत आहे! रॅगोझिन् हा लेखक १८९५ सालीं ( म्हणजे केशवसुतांचाच समकालीन ) लिहिलेल्या 'वेदिक इंडिया' या आपल्या ग्रंथांत सोमरसाविषयी म्हणतो, "The following passages, culled here and there, although enthusiastic, depict no abnormal condition of body or mind, but may be produced by the moderate and wholesome use of a rich stimulant." मग वेदांतील सोमरसाचें वर्णन करणारे उतारे देऊन तो पुढे म्हणतो, "Through all this runs a consciousness of the presence of something divine in the liquor which can produce such wonderful effects in those who partake of it." ( इंग्रजी उताऱ्यांचा सारांश : सोमरसपानाने शरीरावर किंवा मनावर विकृत परिणाम झाल्याचें वर्णन नाही. या पेयांत कांही दैवी अंश असावा, अशी समजूत दिसते; त्यामुळे या पेयाचे परिणाम आश्चर्यचकित करणारे असत असें म्हणतात. )

या सोमरसपानासाठी अगदी मी मी म्हणविणारे ऋषीदेखील कसे लंपट झालेले असत हें पाहिलें म्हणजे मोठा विनोद वाटतो. कदाचित् आपल्याला सोमरसाची अवीट चव माहीत नसल्यानेच हें हसूं येत असेल! सोमरसाचीं वर्णनें खरोखरच इतकीं विलक्षण आहेत की तीं वाचून आपण आश्चर्यमुग्धच होतों. सोमरस हा सध्या कुठे मिळत नाही, हें तर उघडच आहे. पण वेद-कालींदेखील तो अतिशय दुर्लभ होता. नगाधिराज देवतात्मा हिमालयावर उंच उंच ठिकाणीं वनौषधिराज सोम सांपडत असे. सोम वनस्पति विकत घेण्या-साठी सुंदर वस्त्रें, जनावरें, गाई, एवढेंच काय सोनेंहि द्यावें लागे. पण इतकी भरपूर संपत्ति देऊनहि एखाद्या विक्रेत्याने ती वनस्पति दिली नाही, तर त्याला माराचा प्रसाद देऊन हाकलून देण्यांत येत असे! सोमाचा विचार करतां-करतांच ऋषींना काव्य स्फुरूं लागलेलें असें! मग सोमरस तयार करण्याचा

विधि सामसंगीत सुरू होत असे. न गातां सोमरस केला तर सोमासाठी आसुसलेल्या इंद्रालादेखील तो चालत नसे. इंद्र हा सोमरसासाठी वेडा होत असे. त्याचें नांवच ' सोमपा ' ( म्हणजे सोम पिणारा ) असें ठेविलें आहे ! एके दिवशीं नवऱ्याने बाहेर काढलेली एक रोगी बाई सोमाचा पाला खात होती. इंद्राला वास आलाच ! त्याने घाईने जाऊन तोच सोम प्राशन केला आणि प्रसन्न होऊन तीला हव्या असणाऱ्या सर्व गोष्टी तिला देण्याची व्यवस्था केली ! इंद्र बोलून चालून देवच. त्यांत पराक्रम करणारा, वृत्रवध करणारा ! तेव्हा त्याला सोमाचे तलावच्या तलाव लागत ! तीन-चार-पांच डोक्यांच्या देवांचीं वर्णनें सर्वांना माहीत आहेत. पण भरपूर यथेच्छ सोम प्यायला मिळावा म्हणून इंद्राला दोन पोटें असल्याचें वर्णन आहे ! हा सोमरस तयार होण्याच्या प्रत्येक अवस्थेतून जात असतांना कवींना कल्पनाच कल्पना स्फुरत असत. तयार झाल्यावर सुवर्णपात्रामध्ये दुधासारख्या पेयांत तो मिसळला जात असे. ' हा सोमरस मूळचाच तीव्र, पण गायिलेल्या गीतांमुळे तो अधिकच तीव्र झाला आहे. तरुणी तरुणांत मिसळते त्याप्रमाणे हा सोमरस दुधांत मिसळत आहे ', अशा आशयाचीं तीं वर्णनें आहेत ! हा सोमरस सर्व देवतांना बोलावून त्यांच्याबरोबर प्राशन केला जात असे. सोमरसाचीं हीं वर्णनें ऋग्वेदांत सर्वत्रच आहेत. पण ऋग्वेदाच्या दहा मंडलांतील एक सबंध मंडल ( मंडल नववें ) सोमरसाला वाहिलें आहे, हें सांगितलें म्हणजे पुरें !

सोमरसासंबंधी ऋषींची कल्पना काय होती, हें त्यांच्याच शब्दांत आता पाहूं. ' शुभ आणि संग्रामयोग्य तेज धारण करणारा, स्तोत्रें ऐकणारा, ज्ञाता, महान्, सर्वद्रष्टा व जागरणशील सोम पिळला असतां भांड्यांत शिरो. (९.९७.२) '. ' आम्ही ज्ञान देणाऱ्या सोमाचा रस इच्छितों. (९.१०.८.)'. ' शहाणे लोकच त्याला ( सोमाला ) प्राप्त करतात. जो ( सोमप्राप्तीचें ) कर्म करण्यास असमर्थ असतो, तो खालीं ( नरकांत ) पडतो. ( ९.७३.९. ) '. ' बायको नवऱ्याला देते त्याप्रमाणे सोम सुख देतो... हे सोमा, स्तुत्य असा तूं लढाईत जागृत असावेंस. ( ९.८२.४ ) '. ' स्तवनप्रिय आणि सत्यस्वरूप अश्वीहो ! हा ( सोमरस ) तुमच्या मनाचीं कपाटें उघडील. ( १.४६.५. ) '. 'सोम पिऊन उत्साह प्राप्त झाल्यावर (इंद्र) सुंदर भाषणें बोलतो. (१०·४४·८.)'. थोडक्यांत म्हणजे, सोमांत अपरिमित सामर्थ्य आहे ( ९.४२.३. ) आणि

तो सर्वगुणसंपन्न आहे. ( १.१३९.१०. ). हें वाचल्यानंतर स्वाभाविकपणेच सोमरसपानाने मनांत कोणते विचार उत्पन्न होत असतील हें जाणण्याची आतुरता, जिज्ञासा अनावर होते. ज्याचें सोमावर अमर्याद प्रेम त्या इंद्रालाच सोम प्यायल्यावर काय वाटतें तें पाहा. हा लवरूप इंद्र गातो आहे, "गाय देऊं की घोडा देऊं असें मन असतें. कारण, पुष्कळ वेळां मी सोम प्यायलों आहें. (आणि म्हणून संतुष्ट झालों आहें ). अत्यंत वेगाने वाहणारे वारे झाडें हालवतात त्याप्रमाणे प्यालेला सोम मला झोकांड्या देत आहे. कारण मी पुष्कळ सोम प्यालों आहें. जलद जाणारे घोडे रथ ओढतात. त्याप्रमाणे प्यालेला सोम मला ओढीत आहे. कारण मी पुष्कळ सोम प्यालों आहें. हंबरणारी गाय जशी प्रिय पुत्राकडे जाते त्याप्रमाणे स्तोत्रें माझ्याकडे येत आहेत. कारण मी पुष्कळ सोम प्यालों आहें. सुतार रथाची बैठक मनापासून करतो, त्याप्रमाणे मी अंतःकरणपूर्वक स्तोत्रें ऐकतों. कारण मी पुष्कळ सोम प्यालों आहें. पांच वर्णात्मक असणारें सर्व जग माझा दृष्टिक्षेप टाळूं शकत नाही. कारण मी पुष्कळ सोम प्यालों आहें. द्यावापृथ्वीची जोडी माझ्या एका बाजूइतकीहि नाही. कारण मी पुष्कळ सोम प्यालों आहें. मीं आपल्या मोठेपणाने द्युलोकाला कमी केलें आहे आणि विशाल पृथ्वीलाहि कमी केलें आहे. कारण मी पुष्कळ सोम प्यालों आहें. मला असें वाटतें की ही पृथ्वी येथे ठेवावी किंवा तेथे ठेवावी ! कारण मी पुष्कळ सोम प्यालों आहें. मी ह्या पृथ्वीला किंवा सूर्याला येथे नष्ट करीन किंवा तेथे नष्ट करीन. कारण मी पुष्कळ सोम प्यालों आहें. मीं आपला एक भाग द्युलोकांत ठेवला आहे आणि दुसरा खालीं पृथ्वीवर ठेवला आहे. कारण मी पुष्कळ सोम प्यालों आहें. हवि ग्रहण करणारा व सुशोभित असणारा मी देवांकडे हवि वाहून नेतों. कारण मी पुष्कळ सोम प्यालों आहें."

दहाव्या मंडलांतील ११९व्या सूक्ताचें श्री. चित्रावशास्त्री यांनी केलेलें हें भाषांतर आहे. रॅगोजिन्चें भाषांतर मात्र जरा वेगळें आहे. त्याने, हें सूक्त एका ऋषीनेच म्हटलें आहे अशा रूपांत हें भाषांतर केलें आहे. एक ऋषीच हें म्हणत आहे अशी कल्पना करून आणि तसे बदल लक्षांत घेऊन हें सूक्त मुद्दाम पुनः वाचलें म्हणजे त्याचें महत्त्व लक्षांत येतें. नाही तरी ही गोष्ट खरीच की, एका ऋषीलाच तें स्फुरलें आहे आणि इंद्राशीं एकरूप होऊन तो हें म्हणत आहे; त्या विलक्षण भावनांचा प्रत्यय आल्याने त्याच्या तोंडून उत्स्फूर्त काव्याचा

ओघ वाहत आहे. आणि हें सूक्त व ही भूमिका ध्यानांत घेऊन केशवसुतांची ' स्फूर्ति ' ही कविता वाचली असतां काय प्रत्यय येतो ?

' स्फूर्ति ' ही कविता लिहितांना केशवसुतांच्या मनांत हें सूक्त असलें पाहिजे, असें सहजच मनांत येतें. इतकेंच काय, ऋग्वेदांतील अनेक स्थळांचा उल्लेख या कवितेंत प्रत्यक्षपणें किंवा अप्रत्यक्षपणें येऊन गेलेला आहे. ' काठोकाठ भरूं द्या पेला ' असें केशवसुत म्हणतात. ' सोमाची काठोकाठ भरलेली तीस भांडीं इंद्राने एका घोटासरशी पिऊन टाकलीं. (८·७७·४.)' ' गा मग सुचतिल तीं गाणीं ' असें ते सांगतात. ' तुतारी ' ऐकून भोवताली जमलेल्या कवींनाच ते हें म्हणत आहेत, हें उघड आहे. वेदकालीन ऋषीहि आपल्या मित्रांना म्हणतो, ' हे स्तोतेहो, सोमरूपी अन्नाने उत्साहित होऊन ज्ञानपूर्ण, श्रवणीय आणि समर्थ अशा इंद्राचीं मोठमोठालीं स्तोत्रें जशीं कराल तशीं तुम्ही गा. (८·४६·१४.)' या पेयाच्या उष्णतेने द्यावापृथ्वी चटकन् वितळून त्यांत मिसळायला हवींत, असें केशवसुत म्हणतात. ऋषि म्हणतात, ' जो सोम ह्या दोन आयांच्याप्रमाणे द्यावापृथ्वीचें सार ग्रहण करतो तो सोम सर्व मादकांतील मुख्य आहे. (९·१८·५.)' ' देवदानवां नरें निर्मिलें, हें मत लोकां कळवूं द्या ! ' असें केशवसुत म्हणतात. या चरणाला वेदांतून कांही आधार लाभणार नाही, असें कुणाला वाटेल. पण एक ऋषि म्हणतो, ' हे इंद्रा, तूं आमच्या स्तोत्राने मोठेपणा पावला आहेस. ' ऋषींची आपल्या सामर्थ्याविषयी ही जाणीव होती ! (१०·५०·४.) पुढे एके ठिकाणीं म्हटलें आहे, ' ज्या महर्षींनी स्थावर-जंगमात्मक सृष्टि निश्चल असतांना हे सर्व प्राणी निर्माण केले, ते सर्व ऋषि स्तोते स्तोत्रांनी स्तवितात, त्याप्रमाणे ह्या विश्वकर्म्याकरता सर्व प्रकारच्या चरुपुरोडाशादिक पदार्थांचा होम करतात. (१०.८२.४.)' प्रलयाच्या वेळीं मनूला होडीमध्ये ऋषि घेण्यास सांगितलें होतें, कारण नवी सृष्टि निर्माण करणें हें त्यांचें कार्य. या सूक्तांतहि असाच उल्लेख आहे. वर स्वर्गांत कुणी तरी यज्ञ करतें, त्यामुळे निसर्गांत अनेक घटना घडतात; यज्ञ आणि या घटना यांचा दृढ संबंध आहे; पृथ्वीवरील यज्ञ म्हणजे वर घडणाऱ्या घटनांची प्रतिकृतीच; त्यामुळे यज्ञ केला की त्या घटना घडणारच; हें सर्व ऋषींना कळतें; अशीं वेदांत वर्णनें आहेत. म्हणजे ऋषींची निसर्गशक्तींवर सत्ता असते ! आणि आर्यांचे देव म्हणजे या निसर्गशक्तीच ! अग्नि हा देव

पृथ्वीवर वनस्पतींत सांपडतो. सोमरसांतील उष्णतेने तर तो प्रत्यक्षच जाणवतो. मग सोमरस पिऊन पिऊन पिणारे अखेरीस तल्लीन होऊन, 'मनांत दंग होऊन' उद्गारतात, "आम्ही सोम प्यालों आहोंत. आम्ही अमर झालों आहोंत. आम्हीं देवांना जाणलें आहे." (पाहा—वेदिक इंडिया, पृ. ३९२). आणखी एके ठिकाणीं म्हटलें आहे, 'हे इंद्रा, तुझें आणि विमद ऋषीचें सख्य कधीहि नष्ट न होवो.' (१०·२३·७). अशा प्रकारचीं वर्णनें ऋग्वेदामध्ये अनेक ठिकाणीं सांपडतात. 'देवदानवां नरें निर्मिलें' ही कल्पना केशवसुतांसारख्या कवीला स्वतःलाच सुचणें अशक्य नाही; पण ती वेदांतील विचारांना विरोधी नाही. वेदांतलि विचार पाहून त्यांची ती कल्पना दृढ झाली असेल, आणि ती लोकांना सांगण्याची इच्छा त्यांच्या मनांत उद्भवली असेल. पृथ्वविर कुणी शंभर यज्ञ करूं लागला, तर इंद्राला आपली 'शतक्रतु—शंभर यज्ञ करणारा' ही पदवी जाईल की काय असेंहि वाटे आणि तो त्या मानवाच्या कार्यांत अडथळे आणी वगैरे गोष्टी प्रसिद्ध आहेत. येथेहि ऋषींचेच विचार केशवसुत पुढे चालवीत आहेत, असें वाटतें. ऋषींनी सांगितलें आहे, "रम्य स्तोत्रें बनवा. कर्में करा. पैलपार जाण्यासाठी वल्ह्यांनी सज्ज असलेली नाव तयार करा व तयार असा. हे मित्रहो, यज्ञ पुढे न्या. (१०·१०१·२)" म्हणूनच जणू कांही केशवसुत कल्पनेची नौका करून व्योमसागरावर जायला निघाले आहेत, आणि त्याच ऋषींच्या आत्मप्रत्ययांत थोडी भर घालून 'अडवतील जर देव, तरी। झगडूं त्यांच्याशीं निकरीं' असें म्हणत आहेत, असें वाटतें. 'उडुरत्नें या गरिब धरेला तेथुनि फेंकुनिया देऊं', असें केशवसुत म्हणतात. 'पिळलेला सोम दात्यांना पृथ्वीवरील, अन्तरिक्षांतील आणि स्वर्गीय अशी सर्व संपत्ति देवो', असें वर्णन वेदांत आहेच. (९·३६·५.) पुढे 'निजती ते ठारचि मरती', असें केशवसुत म्हणतात. अग्नि ही देवता कशी जागृत आहे, हें सांगायला नकोच. पण सोम हाहि 'जागरूक' आहे अशी त्याची स्तुति केलेली आहे. (९·३६·२.) 'आम्हांला झोपेने त्रास देऊं नये', अशी एक प्रार्थना आहे. (८·४८·१४.) आणि 'पराक्रमहीन लोक दुःख पावतात' असें एके ठिकाणीं स्पष्ट सांगितलें आहे. (४·५·१४·). 'जुलुमाचे या करूं पहा तुकडेतुकडे' असें केशवसुत म्हणतात. वैदिक आर्य तर जुलुमाचा नाश करण्यासाठी सतत सज्जधनु होतेच. 'सर्व

दुष्टांचा नायनाट करा. (१·८६·१०·)' 'सत्याचा नाश करणाऱ्या पापी... अशांचा मी हिंसक आहें. (१०·२७·१·)' 'हे अग्ने, मनुष्यांचा मनुष्य फार द्रोह करतात. म्हणून तूं आमच्यावर चालून येणाऱ्या शत्रूंना जाळून टाक. (३·१८·१·)' 'राक्षसांचा नाश करीत, तेजाने प्राचीनकालाप्रमाणे प्रकट होत पावक सोम पाझरतो. (९·४९·५·)'. परंतु या कवितेंतील सर्वांत महत्त्वाचे शब्द वाटतात ते 'रूढिचे दास क्षणीं ते खवळूं द्या ! ' हे. कारण ही कल्पनाच अगदी आधुनिक आहे, अशी प्रचलित कल्पना आहे. पण वस्तुस्थिति तशी नाही. वेदांतील आर्यांना केवळ सत्याचीच ओढ होती. 'आम्हीं उत्तम तऱ्हेने विवेकदृष्टीने पाहावें म्हणून आम्हांला, ईश्वरा, पुरीं शंभर वर्षे आयुष्य दे, ' असें ते म्हणत. (२·२७·१०·) 'हे इंद्रा,...तूं सर्व जगभर सत्यधर्मांचा प्रसार कर, त्याचा सर्वत्र प्रवेश असो. (३·३०·६·)' 'नाव वल्हविणाऱ्या-प्रमाणे हरितवर्ण सोम सत्याच्या मार्गावरील भाषा बोलतो ', इत्यादि ठिकाणीं रूढींवर भर न देतां सत्यावर भर दिला आहे, हें लक्षांत घेतलें पाहिजे. हें सत्य म्हणजे केवळ कर्मकांडविषयक सत्य नव्हतें. तर जीवन–सृष्टि–विश्व या सर्वांतील सत्य शोधून घेण्याची तीव्र जिज्ञासा त्या आर्यांच्या मनांत होती. म्हणूनच देवांविषयीहि शंका घेण्यास ते मागेपुढे पाहत नसत. 'अग्नि हा देव ! पण जन्मल्याबरोबर आपल्या जन्मदात्यांनाच (काष्ठांनाच) खाऊन टाकतो. हें कसें ?' असें एक ऋषि विचारतो ! ते ऋषि देवांची उपासना करीत होते; कारण आपल्या सत्यसंशोधनांत त्यांची मदत होईल अशी आशा त्यांना वाटत होती. विश्वाचें रहस्य समजायचें तर बुद्धीहि विशाल, तेजस्वी, प्रेरणा देणारी, स्फुरण पावणारी पाहिजे. याच कारणासाठी अशाच प्रकारची बुद्धि द्या म्हणून ते ऋषि देवांच्या मागे लागले होते. सत्यावर इतकें मनापासून प्रेम करणारी व्यक्ति रूढीची दास होऊं शकत नाही, हें सूर्यप्रकाशासारखें स्पष्ट आहे.

अशा रीतीने 'स्फूर्ति ' ही कविता वैदिक वाङ्मयांतून निर्माण झाली आहे, यांत संदेह नाही. खरें म्हणजे, हें असें सिद्ध करून दाखविण्याची तरी काय आवश्यकता ? स्वतः केशवसुतच, वेदकालीन थोर ऋषींनी जो सोमरस निर्माण केला तो मागत आहेत. केशवसुतांनीं स्वप्राणाने 'तुतारी ' फुंकतांच त्यांच्याभोंवतीं कविमंडळ कसें जमा झालें, हें आता

सर्वांना माहीत आहे. या मंडळांत सर्वांसमवेत घेण्यासाठी केशवसुतांना एक पेय हवें होतें, हें स्वाभाविकच झालें. आणि म्हणून केशवसुतांनी सोमरसाची मागणी केली. त्यांची स्फूर्ति वेदांपासून होती. म्हणूनच त्यांनी या वैदिक पेयाची मागणी केली. हीच त्यांची स्फूर्ति इंग्रजी वाङ्मयांतूनच असती, तर त्यांनी एखादें इंग्रजी पेय मागवलें असतें. आणि असें पेय मिळवणें त्यांना अशक्य नव्हतें. त्या मधल्या स्थितींतल्या अनेकांनी इंग्रजी पेयाचाच स्वीकार केला होता ! आणि असें इंग्रजी पेय पिणेंच योग्य आहे असें वाटलें असतें तर, देवदानव हे मानवनिर्मित आहेत असें बिनदिक्कतपणें म्हणणारा हा माणूस तें प्यायल्यावांचून राहिला असता असें वाटत नाही. केशवसुतांच्या ज्या निराशेचा उल्लेख पुनः पुनः केला जातो ती निराशा, तसें पाहूं गेलें असतां, इंग्रजी पेय मागविण्यासाठी सबब म्हणून त्यांना सांगतां आली असती. पण परिस्थितीपासून पलायन करण्यासाठी त्यांना एखादें पेय नको होतें. तर परिस्थितीचें संपूर्ण वास्तव दर्शन करून देणारें आणि नवीन कल्पना सुचवून चालू परिस्थिति आमूलाग्र बदलवून टाकण्याचें सामर्थ्य देऊं शकणारें पेय त्यांना हवें होतें. तें त्यांच्या मर्मग्राही दृष्टीला वेदांतील सोमरसांत दिसलें ! 'म्हणेल जग आम्हांस मद्यपी पर्वा कसली मग त्याची ?' असें ते विचारतात, या ओळीचा अर्थ नीट पाहिलें असतां सहज लक्षांत येईल. ध्येयाची वाटचाल करणारे पुरुष सामान्य माणसांना नुसते वेडेपीरच वाटत असतात, या अर्थानें केशवसुत या शब्दांतून बोलत आहेत. 'जग आपल्याला मद्यपी म्हणेल कारण जगाला आपलें खरें स्वरूप लवकर कळणार नाही. पण जगाने 'दारुड्या' अशी हाक मारली तरी ती मनावर घेण्याचें आपल्याला काय कारण ? आपण मागत आहोंत सोम, दारू नव्हे', असा या ओळीचा अर्थ आहे. पण सोम म्हणजे दारूच असें समजणाऱ्यांनी 'केशवसुतांना सोम हवा, म्हणजे मद्य हवें, म्हणजे केशवसुत मद्यपी' अशी समजूत करून घेतली असेल तर ती शक्य तितक्या लवकर टाकून द्यायला पाहिजे; कारण ती टाकून दिल्याशिवाय केशवसुतांचें खरें स्वरूप कळणार नाही. केशवसुत सोम आणि मद्य यांत फरक करीत नाहीत असें म्हणणें म्हणजे केशवसुतांनी व्यक्त केलेली शंका खरी करणेंच होय.

या ठिकाणीं कुणी विचारील, " केशवसुतांनी वेद वाचले हें कशावरून ? त्यांना संस्कृत तरी येत होतें का ? आणि ' सोमरस द्या ' अशी याचना ते कां करतात आणि कुणाकडे करतात ? "

केशवसुतांनी क्रांति केली आहे हें ज्यांना मान्य आहे, त्या बहुतेकांना त्यांनी ती क्रांति जाणीवपूर्वक केली आहे हें मान्य आहे. ते स्वतः आपल्याला एक अलौकिक जाणीव झाली आहे असें म्हणतातच. तसेंच आपण कांही विशेष कार्य करणार आहोंत याचीहि जाणीव त्यांना जवळजवळ सुरुवातीपासून होती. सामान्य बुद्धीच्या माणसाच्या बाबतींत हें शक्य होईल असें वाटत नाही. तसेंच, त्यांचा सरल स्वभाव लक्षांत घेतां, आर्य, वेद, ऋषिमुनी, सोम, होम इत्यादि अनेक गोष्टींचे उल्लेख त्यांनी पुरेशी माहिती न मिळवतां केले असतील असें वाटत नाही. अपुऱ्या माहितीने अशी स्फूर्ति होईल काय ? केशवसुत हे त्या मधल्या स्थितीचे प्रातिनिधि नसून, देशाला जाग आणण्यांत गुंतलेल्या विचारवंतांपैकी एक आहेत, हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे. तसेंच इंग्रजी विद्या हें वाघिणीचें दूध आहे हें एकीकडे सांगत असतांनाच लगेच ' येथील तृणाला जरी कुणी अनार्यता लावली तरी तें खपणार नाही ' असें चिपळूणकर आवेशाने सांगत होते. आपल्या समाजरूपी जुनाट वृक्षाच्या खूप शाखा तोडल्या पाहिजेत, शिमग्यासारखे सण नष्ट केले पाहिजेत, असें सांगत असतांना आगरकरहि दिवाळीसारखे सण जतन करायला पाहिजेत, असेंच प्रतिपादन करीत होते. केशवसुतांची ' दिवाळी ' कविता या ठिकाणीं ध्यानांत येते. ' केसरी ' हें तर राष्ट्राच्या त्या जाग येत असलेल्या स्थितीचें नेमकें प्रतीकच होतें. वेदप्रेमी लोकमान्यांनी गणेशोत्सव, शिवाजीउत्सव सुरू केले होते. वेदांविषयीच बोलायचें तर, केशवसुतांच्याच काळीं स्वामी विवेकानंद वेदांताची पताका सगळ्या जगांत फडकवीत होते ! केशवसुतांच्या मनावर याचा परिणाम झाल्याशिवाय राहिला असेल काय ? मराठींतच पाहायचें तर पुढील ग्रंथ त्या वेळीं प्रकाशित झाले होते आणि त्यांतले कांही चांगलेच गाजले होते.

वेदोक्तधर्मप्रकाश : विष्णुबुवा ब्रह्मचारी
पुरुषसूक्त व्याख्या : स्वधर्महितेच्छु
वेदाविषयी निबंध : का. बा. मराठे

वैदोक्त धर्माचा विचार : मं. इ. नेरूरकर

हें सगळें लक्षांत न घेऊन कसें चालेल ? श्री. माडखोलकर लिहितात, "चिपळूणकरांनी ज्या वर्षात निबंधमाला काढून मिशनरींच्या दुर्मतदलनाला प्रारंभ केला, त्या वर्षात यांचा (म्हणजे केशवसुतांचा) धर्मांतर करण्याचा विचार चालला होता." आता, काव्य म्हणजे आत्माविष्कार ही व्याख्या केशवसुतांनी आधुनिक मराठींत रूढ केली, तेव्हा धर्मांतरासारखा सगळें अस्तित्वच हादरवून सोडणारा प्रश्न जर त्यांच्या मनांत इतक्या आवेगाने आला असेल, तर त्याचा पुरावा त्यांच्या काव्यांत कुठे तरी आढळायला पाहिजे. पण असा कांही पुरावा सांपडतो काय ? आपले कविमित्र टिळक यांच्या धर्मांतरामुळे (सन १८९५) त्यांच्या मनांत अनेक विचार उत्पन्न झाले असतील, आणि त्यांनी सहानुभूतीने त्यांचा विचार केला असेल. पण त्यांच्या मनांतील दृढ स्वदेशप्रेमामुळे आणि स्वधर्मप्रेमामुळेच त्यांनी धर्मांतर केलें नाही, असें वाटतें. 'आपल्या हिंदु समाजांत रूढींचें प्राबल्य झालें आहे म्हणून दुसऱ्या धर्माच्या समाजांत शिरणें म्हणजे फक्त शृंखलांतर आहे, अविचार आहे', या आशयाचे गुलामांच्या राष्ट्राविषयी कळकळीने विचार करणाऱ्या आपल्या गुरूंचे—आगरकरांचे—उद्गार केशवसुत कधी विसरले असतील, अशी कल्पना करवत नाही. एवढेंच नव्हे, तर आपल्याला जें कांही हवें आहे तें वैदिक धर्मातच मिळेल अशा विश्वासानेच त्यांनी सोमरस मागितला आहे. त्यांचे ते शब्द अगदी लख्ख स्पष्ट आहेत. त्यांची 'स्फूर्ति' ही कविता (सन १८९६) म्हणजे एक आधुनिक सूक्तच वाटते. केशवसुतांचें सर्व तत्त्वज्ञान या कवितेंत आलें आहे, त्यांच्या सबंध व्यक्तिमत्त्वाचें प्रतिबिंब या कवितेंत स्वच्छ पडलें आहे हें सहज दाखवून देतां येईल. केशवसुतांची ही कविता संपूर्णपणें प्रसादपूर्ण, ओजस्वी, यशस्वी आहे हें टीकाकारांना मान्य झालेंच आहे. पण वरील सर्व विवेचन ध्यानांत घेतल्यावर, केशवसुतांची एकच एक कविता निवडायची झाली (हें करणें किती अवघड आहे, हें रसिकांना सांगायला नको) तर, स्वतः केशवसुतांनीहि हीच कविता निवडली असती असें मनात येतें !

केशवसुतांच्या संस्कृत भाषेच्या ज्ञानाविषयी प्रा. देशपांडे लिहितात, "गणित आणि संस्कृत हे विषय चांगले नसल्यामुळे केशवसुत मॅट्रिकच्या

परीक्षेंत दोनदा अनुत्तीर्ण झाले, असें केशवसुतांचे बंधु सी. के. दामले सांगतात आणि 'संस्कृत भाषेचा त्यांचा अभ्यास गाढ असावा' असा राजाध्यक्ष अंदाज बांधतात ! असो." प्रा. म. वि. राजाध्यक्ष यांचें मूळ विधान खरें म्हणजे सरळ आहे. ते म्हणतात, "संस्कृत भाषेचा त्यांचा अभ्यास गाढ असावा याचा पुरावा भाषांतरापेक्षाहि त्यांच्या संस्कृत शब्दांच्या रेखीव योजनेंत आढळेल." संस्कृत भाषेचा अभ्यास असल्यावांचून केशवसुतांनी संस्कृत शब्द योजिले आहेत काय ? इतकेंच काय, मराठींत रूढ नसलेले जे संस्कृत शब्द केशवसुतांनी वापरले आहेत ते मग कसे ? केशवसुतांच्या कवितांत सुरुवातीलाच संस्कृत-वरून घेतलेल्या कविता सापडतात असें नाही. त्यांच्या कवितांच्या शेवटी शेवटीदेखील कच-देवयानी आणि राजा शंतनु या संस्कृत व्यक्ति आपल्याला भेटतात. संस्कृतचें प्रेम त्यांच्या काव्यांत सर्वत्रच आहे. कोणतेंहि तत्त्व सांगायचें झालें की ते संस्कृतचाच आश्रय घेतात.' कुत्राप्यस्मि च सर्ववस्तुषु', 'सत्त्वाचा 'उदयोऽस्तु' करा', "तम अल्प-द्युति बहु", इत्यादि काव्यपंक्ति काय दर्शवितात ? तत्त्व सांगत असतांना त्यांना संस्कृतचा अवलंब करावासा वाटतो. या वस्तुस्थितींतच केशवसुतांच्या व्यक्तिमत्त्वाचें रहस्य दडलेलें आहे. संस्कृत ही ऋषिमुनींची, महाकवींची भाषा ! केशवसुतांना त्या सुसंस्कृत जीवनाचा ध्यास होता. त्यांच्या काव्यांत अस्सल मराठी शब्द कित्येक ठिकाणीं आढळतील. बोलून चालून मराठीच कवि होते ते. पण संस्कृतचा त्यांच्या-वरील प्रभाव कधीहि कमी झाला आहे, असें दिसत नाही. याचें आकडे-शास्त्राच्या साह्याने कुणी संशोधन करून पाहील तरी हेंच सिद्ध होईल असें वाटतें. अर्थात् नुसत्याच संस्कृत शब्दांचा त्यांच्या काव्यावर प्रभाव पडला आहे असें म्हणणें म्हणजे त्यांनी संस्कृतांतील फक्त 'अमरकोश' पाहिला होता असें म्हणण्याजोगें होईल. त्यांच्यावर संस्कृतचा म्हणजे संस्कृत वाङ्मयाचा, विशेषतः वेदवाङ्मयाचा प्रभाव आहे. जुन्याजुन्या मराठी माणसाला अखिलभारतीय संस्कृतिविषयी जिव्हाळा वाटतो; 'हिंदवी स्वराज्य व्हावें हें श्रीचे मनांत आहे' हीच महाराष्ट्राच्या राजर्षीची प्रेरणा ! याचमुळे केशवसुतांना संस्कृतविषयी प्रेम वाटतें. परीक्षेंत ते संस्कृतांत अनुत्तीर्ण झाले म्हणून त्यांचें संस्कृत भाषेवर 'प्रेम' नव्हतें, असें

म्हणतां येईल असें वाटत नाही. परीक्षेत अनुत्तीर्ण होणाऱ्या अनेक विभूति महाराष्ट्राच्या परिचयाच्या आहेत ! आणि, जी गोष्ट आपल्याला व्यावहारिक दृष्टीने जमत नाही तिच्यावर प्रेम करूं नये, असा दंडक घातला तर काय होईल याची कल्पना करण्याने कांही काळ मनाचें रंजन होऊं शकेल ! केशवसुतांचें संस्कृतवर प्रेम कसें होतें याचा पुरावा ' स्फूर्ति ' या कवितेच्या निमित्ताने वर दाखवलाच आहे. केवळ एवढ्या एका कवितेपुरताच वेद त्यांनी वाचला असेल असें कुणालाहि म्हणावेंसें वाटणार नाही. त्यांच्या वेदवाचनाचा तो एक सारभूत आविष्कार आहे.

पण ते ' शेष तयाचा ( सोमाचा ) द्या ' असें कां म्हणतात ? हा प्रश्न ऐकतांच ' एक तुतारी द्या मज आणुनि ' ही ओळहि आठवते. कविप्रतिभेविषयी अत्यंत महान् कल्पना असलेल्या या कवीने असें कां म्हणावें, याचें कुणाकुणाला आश्चर्य वाटतें. पण यांत विसंगति नाही असें दाखवून देतां येईल. कवीची प्रतिभा ही ' अत्यद्भुत गूढ शक्ति ' आहे हें मान्य करूनहि तिला परंपरेच्या वारशाची आणि निरनिराळ्या ठिकाणीं मांडल्या जात असलेल्या विचारांची जोड मिळणें आवश्यक आहे. हाच ध्वनि यांतून निघतो, असें वाटतें. आणि म्हणून हें महान् कार्य करणाऱ्यांना केशवसुतांनी हें आर्त आवाहन केलें आहे असें मनांत येतें. केशवसुतांनी काव्याची थोरवी गायिली आहे, ती केवळ ते स्वतः कवि होते म्हणून नव्हे. तर त्यांच्या दृष्टीने काव्य हें जीवनाला सर्वांगांनी कवटाळणारें आहे म्हणून. जीवन हें महान् आहे, म्हणून काव्यहि महान् आहे. वरील विवेचनाला हें स्पष्टीकरण धरूनच आहे, हें उघड आहे.

मराठी वाङ्मयाच्या प्रारंभीं संत ज्ञानेश्वरांनी—

**‘ ॐ नमो जी आद्या । वेदप्रतिपाद्या ॥**
**जय जय स्वसंवेद्या । आत्मरूपा ॥ ’**

अशी वेदांचीच आठवण काढली. प्राचीन मराठी वाङ्मयाचा कळस संत तुकारामांच्या—

**‘ वेदांचा तो अर्थ । आम्हांसीचि ठावा ॥**
**येरांनी वहावा । भार माथा ॥ ’**

आणि

**‘ आम्ही वैकुंठवासी । आलों याचि कारणासी ॥**
**बोलिले जे ऋषि । साच भावें वर्ताया ॥ ’**

या अभंगवाणीने झाला. आणि आधुनिक मराठी काव्याचा जन्म —

**‘ सोमाचा रस वेदकाळच्या ऋषिवर्यांनी उकळीला ।**
**शेष तयाचा द्या तर लौकर पिपासु जे त्या आम्हांला ॥ ’**

या कवि केशवसुतांच्या गीताने झाला ! हा योगायोग उगीचच झाला आहे का ? असें वेदांचें रहस्य तरी काय ? तें समजावून घेणें म्हणजेच केशवसुतांची भूमिका पाहणें !

# — २ —

# केशवसुत

## ( उत्तरार्ध )

## अमृत परंपरा

" वाग्देवीसुत जन्मला अपुलिया ग्रामांत; यालागुनी
जैजैकार करा, सुरां परिसवा हा मंगलाचा ध्वनि ! "

असे उद्‌गार आपल्या जन्माच्या वेळीं वनदेवतांनी काढले, असें केशवसुत म्हणतात. केशवसुतांच्या भूमिकेवर हे उद्‌गार प्रकाश टाकणारे आहेत. कवि हा जन्मावाच लागतो असें म्हणतात, हें या ठिकाणीं सहजच लक्षांत येतें. काव्य हें आपलें जीवितकार्य आहे, असें केशवसुतांना वाटत होतें, हें उघड आहे. हीच जाणीव त्यांच्या—

" याचें तोंड कुरूप हें विधिवशात् गाईल काव्यें नवीं
तेणें सर्वहि डोलतील जन हे हर्षें कदाचित् भुवि ! "

या बोलांतून प्रखरपणें बाहेर पडली. आपण कोणत्या स्वरूपाचें गाणें गाणार आहोंत, याविषयींहि त्यांची निश्चित कल्पना होती—

" जो पूर्वीं गुण पुण्यभूमिवरि या अत्यन्त वाखाणिला,
तें हें दिव्य कवित्व दुर्विधिवशें हीनत्व की पावलें,
त्याची बूज करावया न अगदी कोणी कसें राहिलें !
गाणें जें परिसावया कविपुढे राजेशही वांकले,
यन्नादेंच लहानथोर सगळे गुंगून वेडावले,... "

पद्यपंक्तीची तरफ हें विलक्षण साधन आपल्या हातीं विधीनेच दिलें आहे, असें ते म्हणतात हेंहि प्रसिद्धच आहे.

यावरून काय दिसतें ? आबालवृद्ध सर्वांनी, राजेशांनी, एवढेंच काय सुरां-सारख्या श्रेष्ठ रसिकांनीसुद्धा ऐकून भुलून ' माता धन्य पिता धन्य धन्य धन्य

सुहृत्सखे ' असे उद्‌गार काढावेत, अशा प्रकारचें दिव्य काव्य केशवसुतांना गायचें होतें. विधीचाच वरदहस्त असल्यानंतर हें अशक्य आहे काय ? आणि अशा प्रकारच्या काव्याची जी आर्ष, वैदिक, अमृतपरंपरा आहे, तीच परंपरा त्यांना पुढे चालवायची होती ! आत्ताच उद्धृत केलेल्या काव्यचरणांतील कल्पना संपूर्णपणें भारतीय आहेत, हें सिद्ध करून देण्याची आवश्यकता वाटत नाही. प्रा. जोग म्हणतात, " केशवसुतांनी आपल्यास नवीन प्रकारचें म्हणजे इंग्रजी पद्धतीचें काव्य लिहावयाचें आहे हें याच कालांत, अजाणतां कां होईना, निश्चित केलें असावें असें वाटतें. इ. स. १८८६ सालींच लिहिलेल्या आपल्या ' दुर्मुखलेला ' या कवितेंत त्यांनी ' याचें तोंड कुरूप हें विधिवशात् गाईल काव्यें नवीं ' असें म्हटलें आहे, व या कवितेचें स्वरूप सुनीतानुकूल असें ठेविलें आहे. " इंग्रजी धर्तीचा उल्लेख स्वतः केशवसुत कुठे करतात काय ? उलट, आपलें काव्य भारतीयच आहे असे उद्‌गार त्यांच्या काव्यांत जाणीवपूर्वक किती वेळां येतात, हें पाहण्यासारखें आहे. नमुन्यादाखल कांही उदाहरणें वर दिलींच आहेत. केशवसुतांच्या काव्याला प्रस्तावना लिहितांना प्रा. जोग म्हणतात, " पण संस्कृत काय किंवा प्राचीन मराठी काव्याचे संस्कार काय, इंग्रजी काव्याच्याविषयी त्यांना जें आकर्षण होतें त्यापुढे कोठच्या कोठे पार वाहून गेले असें दिसतें. हें आकर्षण इंग्रजी कवितेच्या अंतर्बाह्य स्वरूपाविषयी त्यांना वाटत होतें, आणि फारच जबरदस्त होतें यांत शंका नाही. " केशवसुतांचे स्वतःचे शब्द आणि टीकाकारांचे हे विचार यांचा मेळ घालायचा म्हणजे, वाग्देवीच्या पोटीं हा बाळ जन्माला आला तो इंग्रजी काव्य गाण्यासाठी, विधीने त्यांच्या हातीं काव्यपंक्तीची तरफ दिली ती इंग्रजी काव्याची, शारदेने जो मंत्र त्यांच्या कानीं दिला आणि जें काव्य शारदेचेंच तें सर्व इंग्रजी, सुरांना ते ऐकवणार होते तें इंग्रजीच...असें म्हणावें लागणार नाही काय ? पण असें म्हणतांना ' विसंगती हा विनोदाचा आत्मा आहे ' ही व्याख्या आठवल्यावांचून राहते काय ? केशवसुतांचें काव्य इंग्रजी म्हणायचें, तर केशवसुत ज्या दिव्य काव्याच्या सनातन भारतीय परंपरेचा उल्लेख करतात आणि चिपळूणकरांप्रमाणे, केवळ दुर्दैवानेच या परंपरेला आज वाईट दिवस आलेले आहेत असें म्हणतात त्या त्यांच्या परंपराप्रेमाचें काय करायचें ? केशवसुतांच्या कवित्वाविषयी शंका असूं नये असें प्रा. जोग म्हणतात. त्याअर्थी केशवसुतांनी

जें परंपराप्रेम स्पष्टपणें व्यक्त केलें आहे त्याविषयीहि त्यांना शंका वाटणार नाही असें सहजच मनांत येतें. आणि केशवसुतांची ही भूमिका लक्षांत घेऊनच त्यांचें काव्य वाचायला नको काय ? 'याचें तोंड कुरूप हें विधिवशात् गाईल काव्यें नवीं' या ओळींतील शेवटचे दोनच शब्द ठळकपणें लक्षांत घेऊन चालेल असें वाटत नाही. तर 'विधिवशात्' हा शब्दहि लक्षांत घेणें आवश्यक आहे. काव्य हें करून करतां येत नाही, तें कांही ना कांही प्रमाणांत उत्स्फूर्तच असावें लागतें; आणि ही दैवी स्फूर्ति आपल्याला लाभली आहे, तिच्या योगाने आपल्या हातून काव्य निर्माण होईल, याची आत्मविश्वास उत्पन्न करणारी प्रेरक जाणीव त्यांना झाली होती, हाच या चरणाचा अर्थ आहे, असें दिसतें. केशवसुतांचा भर स्फूर्तीवर किती होता हें त्यांच्या 'स्फूर्ति' या कवितेवरून उघड होतेंच. पण इतरहि अनेक ठिकाणीं त्यांनी स्फूर्तीचा उल्लेख केला आहे. त्यांवरून असें वाटतें की, इंग्रजी प्रकारचें नवीन काव्य करायचें असें कांहीहि त्यांनी ठरवून केलेलें नाही. काव्य हें असें ठरवून होतें काय ?

केशवसुतांनी स्वतःच ज्या अमृतपरंपरेचा प्रेमाने उल्लेख केला आहे आणि ज्या परंपरेला रसिकांची उणीव भासत आहे म्हणून हळहळ व्यक्त केली आहे ती त्यांची परंपरा लक्षांत न घेतल्यामुळे, त्यांच्या काव्यांत अनेक ठिकाणीं विसंगती आढळतात असें टीकाकारांना वाटतें. परंतु केशवसुत नुसते त्या परंपरेंतील आहेत असें नव्हे, तर त्यांची वृत्तीच, त्यांचा आत्माच वैदिक आहे. 'दुर्मुखलेला' ही कविता लिहिण्यापूर्वीच त्यांच्या मनावर इंग्रजीची छाप पक्की पडली होती असें टीकाकार म्हणतात. पण याच सुरुवातीच्या काळांत त्यांच्यावर संस्कृत काव्याची छाप होती असेंहि ते म्हणतात. तसेंच याच त्यांच्या प्रारंभींच्या कवितांत 'उगवत असलेल्या सूर्यास', 'जयाजीराव शिंदे व तुकोजीराव होळकर' अशाहि कविता आहेत. तसेंच, तर १८८६ सालीं त्यांनी इंग्रजी काव्य लिहिण्याची प्रतिज्ञा केली, तर त्याप्रमाणे करण्याची जबाबदारी आपल्या अंगावर पडली आहे, याची जाणीव त्यांना असणारच ! पण 'नवीं काव्यें गाणार' म्हटल्यावर लगेच त्यांनी संस्कृतचा प्रभाव असलेल्या, देशप्रेमाने रसरसलेल्या अशाच अनेक कविता कराव्यात, यांतून त्यांची वृत्तीच प्रकट होत नाही काय ? प्राचीन परंपरा सोडली म्हणजेच कांही नवीन करतां

येतें, असा केशवसुतांचा विचार असल्याचें दिसत नाही. ~~उल्ट~~ ' जुन्यांतून जी निष्पत्ति नवी। काय नव्हे ती श्रेयस्कारक?' असें ते विचारतात तेव्हा त्यांना जुन्याचें महत्त्व मान्य असल्याचें दिसतें. ' जुनें जाउं द्या मरणालागुनि ' असें ते म्हणतात तें जुन्यांत जो सडत चाललेला भाग आहे त्याच्याविषयी, हें अगदी उघड आहे. आणि याविषयी कुणाचें दुमत होईल? हें सर्व लक्षांत घेतलें असतां,

**वैर तयांला, पूर्वांच्या आर्यांचा बडिवार**
**गाउनि जे निज षंढत्वा मात्र दाविती फार**

या ओळींचें रहस्य समजतें. ही टीका आर्यांवर नसून, पूर्वजांच्या पुण्याईवर जगूं पाहणाऱ्या मूर्खांवर आहे. अशा मूर्खांना पूर्वजांचें महत्त्व तरी कसें कळणार?

तेव्हा, जुन्या परंपरेवरच केशवसुतांना नवी इमारत उभारायची होती, हें सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट आहे. ही परंपरा अढळ आहे; कारण तींत सत्य आहे, ऋत आहे, हें त्यांना ' दिसलें ' होतें. आणि हा प्रकाश त्यांच्या प्रतिभेंत पडल्याकारणाने त्यांच्या सर्वच काव्याला एक आगळीच उज्ज्वलता लाभली आहे. ती पाहतांना आपण हरखून जातों. केशवसुतांना नवीन काव्यें करायची होतीं. वैदिक ऋषींनाहि नव्या नव्या काव्यांची ओढ होती. ते म्हणतात, " हे बलिष्ठा इंद्रा, जीं तुझीं आज आम्हीं नवीन स्तोत्रें केलीं आहेत, त्या केलेल्या स्तोत्रांचा तूं स्वीकार करावास. ( ५·२९-१५. )...मी प्राचीन इच्छुक अशा अग्नीकरतां अत्यंत नवीन स्तोत्रें म्हणतों आहें. जशी नवऱ्याला कामुक आणि सुंदर वस्त्र नेसलेली बायको आवडते त्याप्रमाणे मी अग्नीला प्रिय होईन. ( १०-९१·१३. )"

नाविन्याची ओढ आर्यांच्या जीवनांत सर्वत्रच होती. म्हणूनच आर्यांचा सर्वत्र सतत संचार चालू होता. सृष्टीची विविधता पाहण्यासाठीच हा संचार चालू होता हें उघड आहे. ऋषि म्हणतात, " एका पर्वतशिखरावरून दुसऱ्या पर्वतशिखरावर आरोहण करून जेव्हां भक्त इन्द्राचें अगाध कर्तृत्व अवलोकन करतो, तेव्हा इन्द्रहि त्याच्या मनांतील भाव समजतो (१.१०.२.) " पुढे एके ठिकाणीं म्हटलें आहे, " भूमि अनेक रूपांचीं शरीरें धारण करते...

देवांचें हें एक अद्भुत कृत्य आहे. ( ३.५५.१४. ) '' '' परदेशीं आमच्या-बरोबर राहा '' अशी प्रार्थनाहि त्या ऋषींनी देवाला केली आहे. ( १.१२९.९.) अरण्यानी या वनदेवतेचीहि स्तुति ऋषींनी केली आहे. भ्रमन्तीचे हे असे उल्लेख केशवसुतांच्या काव्यांतहि बरचेवर येतात.

**घराला मी आलों अटन करुनी फार दिवशीं,...**
**मनीं माझ्या व्हावी चलित कविताशक्ति, म्हणुनी**
**कशाला एकाकी फिरत असतों नित्य विपिनीं...**
**आत्माराम सुखें वनामधुनि तो होता जरा हिंडत...**
**आराधुनी विपिनदैवत मी तिथूनी**
**त्याचीं प्रसादवचनें मनुजांस आणीं...**

ऋषींचें सृष्टीवर प्रेम होतें. द्यु पिता, पृथिवी माता, सोम बंधु, अदिति बहीण अशीं नातींहि त्यांनी जोडलीं होतीं. ( १.१९१.६. ) ' सरस्वती व सप्तसिंधु आमचें संरक्षण करोत. आपदेवता, वायु, पर्वत, वनस्पति आणि पृथिवी आमचें बोलावणें ऐकोत ' असें गोड आवाहनहि ते करीत. ( ८.५४.४.) हें आवाहन द्यु, सूर्य आणि नक्षत्रांसहित विस्तीर्ण अंतरिक्ष यांनाहि होतें. ( ३.५४.१९. ) केशवसुतांचेंहि सृष्टीवर असेंच प्रेम आहे. म्हणूनच उषा, वनश्री, द्यावापृथ्वी, इत्यादींचे उल्लेख त्यांच्या काव्यांत आढळतात. सृष्टि त्यांना कवयित्रीच दिसत होती. ऋषि म्हणतात, '' ह्या दीप्तिमान उषेने कवितेप्रमाणे चारुता धारण केली आहे. ( १.९२.६. ) '' सृष्टीच्या विलक्षण सौंदर्याने ते ऋषि भुलून गेले आणि उद्गारले, '' हा गमनशील तेजस्वी सूर्य उदयाला आला. हा स्वर्ग आणि पृथ्वीवरून जात असतां सुंदर दिसतो. ( १०.१८९.१. ) हें सुंदर विश्व उत्पन्न करणाऱ्या ईश्वराचा धावा आम्ही प्रत्यहीं करतों. ( १.४.१. ) '' म्हणूनच केशवसुतहि गातात—

**असे सुन्दरता अढळ जरी कोठे**
**तर करी ती सृष्टींत मात्र वास !**

ते आर्य बुद्धिदात्या सूर्याचे उपासक होते. केशवसुत त्यांच्या सुरांत आपला सूर मिसळवतात **' पुण्याची ही वेळ पहा गे ! सूर्याने उजळिली !'** ' या सूर्याने जें हिरण्मय तेज धारण केलें आहे, त्याचें माप घेतां येत नाही.

तो सुस्तुत आणि विश्वव्यापी अशा द्यावापृथ्वीस, स्त्री आपल्या मुलाला कवटाळते, त्याप्रमाणे आलिंगितो ( ३·३८·८· )' अशी वैदिक प्रार्थना आहे. सूर्य हा 'कवळुनि करजालें भूमिलागूनि' आहे असेंच वर्णन करून केशवसुत पुढे ऋषिप्रमाणेच आदराने म्हणतात—

**द्युति बघुनि अशी ती चित्त माझें रमून**
**दिनकर! मज बोधी तूज गाया नमून!**

या सृष्टीविषयी ऋषींची काय कल्पना होती हेंहि पाहण्याजोगें आहे. ते म्हणतात, "हीं सर्व भुवनें त्याच्या शाखाच आहेत, आणि प्राणिमात्रांसुद्धा एकंदर वनस्पतीहि ह्याच्याचपासून उत्पन्न झाल्या आहेत. (२·३५·८.)" केशवसुतांना सृष्टींत कोणता ध्वनि दिसला? त्यांना अलौकिक दृष्टि प्राप्त झाली ती हीच की, 'कुत्राप्यस्मि च सर्ववस्तुषु!' ऋषींनी प्राप्त करून घेतलेलें हें दिव्य सत्य पाहून पाश्चात्य लेखकहि थक्क झाले! रॅगोजिन् म्हणतो, "निसर्गीत एकता आहे, अखिल विश्वाशीं मानवाचें जवळचें नातें आहे, हें अलिकडे विज्ञानाने सिद्ध केलें, पण इतक्या प्राचीन काळीं केवळ काव्यप्रतिभेच्या बळावर हें ऋषींनी ओळखावें हें आश्चर्यचकित करणारें आहे!" (वेदिक इंडिया, पृ. १६७.) दुसऱ्या एका ठिकाणीं (पृ. १३३) हाच लेखक त्या आर्यांविषयी लिहितो, "निसर्ग हेंच त्यांचें देऊळ होतें. माणसांनी बांधलेल्या घरांत देवतेला त्यांनी राहायला बोलावलें नाही." केशवसुत नेमकें हेंच म्हणत नाहीत काय? निसर्गाविषयी ते म्हणतात—

**उंच नाहित देंवळें मुळीं तेथे। परी डोंगर आहेत मोठमोठे**
**देउळीं त्या देवास बळें आणा। परी राही तो सृष्टिमधे राणा**

अशा रीतीने केशवसुतांचा आत्मा वैदिक ऋषीचा होता! म्हणूनच ते लिहितात,

**जेथे ओढे वनराजी। वृत्ति रमे तेथे माझी**
**कारण कांही साक्ष तिथे। मम त्या श्रेयाची पटते.**

त्यांना निसर्गाचा असा स्वाभाविक ध्यास होता. ऋषि म्हणतात, "हे प्रकाशन जाणणारे अश्विहो, कीर्तिमान्, स्वच्छ, पोषक अशा ह्या नदीने तुमचें चांगल्या प्रकारें स्तवन केलें आहे. (८·२६·१९.)" केशवसुतहि तसेंच म्हणतात—

स्तोत्र ओढे थांबल्यावीण गाती
सूर वारे आपुला नित्य देती
वृक्षगण तो हालुनी डुल्लताहे
अशा भक्तीच्या स्थळीं देव राहे !

ऋग्वेदांतील पर्जन्यसूक्त प्रसिद्ध आहे. बेडकांचें ओरडणें ऐकून ते तेंच गात आहेत असें केशवसुतांच्या मनांत येतें.

ऐके पलीकडुनि बेडुक शेतभातीं
पर्जन्यसूक्त सगळे मनसोक्त गातीं !

पर्जन्याला बोलावतांना ऋषि म्हणतात, " चाबकाने घोड्यांना मारीत रथी सैन्य ज्याप्रमाणे पुढे नेतो त्याप्रमाणे पर्जन्य मेघांना प्रकट करतो....ओरड, गर्जना कर. उदकयुक्त रथाने ये. आणि सर्वत्र उदक टाक ( ५·८३·३,७. )" आणि केशवसुत म्हणतात—

झंझावात हयावरी बसुनिया, या पश्चिमाब्धीवरी
लाटा झोडित, गर्जना करित ये, बा मेघराजा तरी !

ऋग्वेदांत म्हटलें आहे, " कपिंजल पक्षी हेच कोणी कवि, आपल्या तारुण्य-भरामध्ये आलाप काढून योग्य कालीं दक्षिण दिशेकडे सुस्वर गायन करीत असतात. ( २.४३.१. ) " पक्षिकवनें केशवसुतांना श्रुतिसुभग तर वाटतातच, पण ते पुढे म्हणतात, " अनुकरण करीं मी गाउनी या खगांचें ! " केशवसुतांना फुलांविषयी अतिशय आकर्षण होतें. पण फुलाला ते काय संबोधतात ?—

फुला, सुरम्य त्या उषेचिया सुरेख रे मुला !

ऋषिमंडळींना सृष्टीचीं तत्त्वें शोधून काढण्यांत मोठा आनंद वाटत असे. केशवसुतांना फुलें याच कारणासाठी आवडतात—

पुष्पामधे प्रकट होय न जें जराही
सृष्टींत एकहि रहस्य असें न कांही !

पण ऋषिमंडळी केवळ दृश्य जगाचा अभ्यास करून थांबत नसत, तर अदृश्याचेंहि चिंतन करीत. केशवसुतांना याच कारणासाठी फुलांचें विशेष महत्त्व वाटतें.

पुष्पीं या प्रीति असे
ती मीपण हाणितसे

**परविषयीं तन्मयता प्रेरिते उरीं**
**ने दृष्टि अंतरीं !**

'हा निबिड अंधकार नाहीसा करा. सर्व दुष्टांचा नायनाट करा. आणि ज्या प्रकाशाची आम्हांस आवड आहे तो प्रकाशहि आम्हांस अर्पण करा. ( १.८६.१०. )' असें ऋषि म्हणतात. केशवसुतांचें फुलावर प्रेम कां आहे, तर 'त्या तम न आवडे'. 'अरण्यानी'च्या स्तुतींत अरण्याचें, तेथील एकांतवासाचें वर्णन केलें आहे. अरण्यांत घुबडाच्या घूत्कारांना पोपटांच्या बोलांनी उत्तर मिळतें, असें वर्णन आहे. केशवसुतांनाहि एकांतवासाची ओढ होती. ते म्हणतात,

**" अहा ! अज्ञात स्थळीं अशा, मातें**
**एक गवतारू खोप रहायातें,... "**

जगद्रुमाचा विचार ऋग्वेदांत आहे. ( १.२४.६,७. ). केशवसुत स्वतःचा उल्लेख 'जगद्रुमाचें पर्ण' असाच करतात. मरुद्गणांचा उल्लेख केशवसुत करतात. ते मरुद्गण ऋग्वेदांतलिच आहेत. " या विषयावर किती सूक्तें आहेत विचारूं नका ! कांही ठिकाणीं हीं सूक्तें निसर्गकाव्यांत शोभेची बहार करतात," असें रॅगोजिन् म्हणतो. केशवसुतांसारख्या कवीला अशा काव्याचें आकर्षण वाटणार नाही असें कसें होईल ?

निसर्गकाव्यावर केशवसुतांनी इतका भर दिला आहे याचें कारण निसर्गा-विषयी त्यांना मनापासून आकर्षण वाटत होतें एवढेंच नव्हे, तर निसर्ग आणि मानव यांचा अविभाज्य संबंध आहे अशी त्यांची विचारसरणी होती, हें होय. 'तेव्हा लौकरच रूढिभक्त राम म्हणतील; आणि सृष्टीला लोक भजूं लागतील, असा रंग दिसत आहे,' असें ते 'रूढि–सृष्टि–कलि (?)' या कवितेच्या प्रारंभीं मुद्दाम स्पष्टपणें गद्यांत म्हणतात हें किती महत्त्वाचें आहे ! सृष्टी-पासून दूर गेलेल्या दैत्यरूढीच्या गुलामांविषयी ते खेदाने म्हणतात —

**सृष्टीचे अमृतध्वनि दुरुनि जे कानांवरी त्यांचिया,**
**येती ते परिसूनि मूर्ख सगळे घेतात चित्तीं भया !**

आणि नंतर, सृष्टीचा विजय होणारच या विश्वासाने ते तिचा जयजयकार करतात ! नीति निसर्गांतूनच जन्मलेली असावी म्हणजेच तिचें पद अढळ

होतें आणि धर्म तेथेंच स्थिर होतो अशी त्यांची बुद्धिनिर्णित कल्पना आहे. ही संपूर्णपणें वैदिक आहे. 'वैदिक संस्कृतीचा विकास' या ग्रंथांत तर्कतीर्थ जोशी लिहितात, " 'ऋत' हें विश्वव्यापी तत्त्व वैदिक ऋषींना नीतिकल्पनेवरून सुचलें. ...मनुष्याच्या अंतरंगांतील नैतिक सत्य आणि विश्वशक्तींच्या अस्तित्वास व व्यापारास प्रेरक असलेलें सत्य एकच होय, अशा निश्चयाला ही विशाल वैदिक प्रतिभा पोचली ". केशवसुतांचा हा विचार किती जाणीवपूर्वक होता !—

**पयस्था त्या देवी, फणिपतिसुता पंकजपदी,**
**स्वयंभू सृष्टीचे नियमाचि सदा मानिति सुधी.**
**स्वयंभू सृष्टीचे नियम सुधरूं पाहत असे**
**नराच्या पेसा या कवण दुसरा मूर्ख गवसे ?**

'केशवसुत तर 'जुनें जाळुनि किंवा पुरूनि टाका' असें म्हणतात, त्यांचें जुन्या वेदांवर प्रेम असणें कसें शक्य आहे,' अशी शंका कुणाच्या मनांत येईल. तिला उत्तर असें की, कृत्रिम, अनैसर्गिक गोष्टी जुन्यापुराण्या होतात. नैसर्गिक गोष्टी कधी तरी जुन्या होतात काय ? याच नैसर्गिक गोष्टींचें ज्ञान म्हणजे वेद. म्हणूनच वेदांना अनादि आणि अनंत म्हणायचें. जीर्णशीर्ण रूढींवर हल्ला करणें हें वैदिक परंपरेला धरूनच आहे.

सृष्टीविषयी केशवसुतांना आणि ऋषिवर्यांना एवढी आत्मीयता वाटण्याचें रहस्य हें आहे. साहजिकच सृष्टीचें जास्तींत जास्त अवलोकन करण्याची दुर्दम्य जिज्ञासा त्या ऋषींच्या चित्तांत अनावर झाली; आणि म्हणूनच ते सगळीकडे हिंडूं लागले नुसतेंच भरपूर खायला-प्यायला त्यांना हवें असतें, तर त्यांच्या प्रिय सिंधु-गंगादि नद्यांच्या खोऱ्यांत त्यांना तें हवें तितकें मिळालें नसतें काय ? त्या आर्यांना ऐश्वर्य हवें होतें यांत शंकाच नाही. 'दिव्यैश्वर्यमंडित' इंद्राची ते स्तुति करतात, " गाईची इच्छा करणारे, घोडे इच्छिणारे, अन्न इच्छिणारे आम्ही स्तोते पराक्रमी, स्त्री देणारा व सर्वदा रक्षण करणाऱ्या इंद्राला विहिरींतून पोहोरा काढावा तद्वत् आपल्याकडे खेचतों. (४.१७. १६.)" केशवसुतहि 'वैर तयांला, जे गरिबी शिकवितात बालांस !' असेंच म्हणतात. पण त्या आर्यांचें केवळ वैभवांत समाधान नव्हतें. विलासासाठी त्यांना वैभव नको होतें. वैभव मागतांक्षणींच पुढे ते काय म्हणतात हें

पाहण्याजोगें आहे. " हे इंद्रा, तूं आम्हांला आश्चर्यकारक ऐश्वर्य दे. आम्हांला अनेक प्रकारची बुद्धि आणि प्रेरणा दे. ( ४·२२·१०· ) " कष्टाशिवाय देव सख्य करीत नाहीत असेंच त्यांचें मत होतें ( ४·३३·११· ) केशवसुतांनीहि उद्योगप्रियतेचें महत्त्व पुनः पुनः गायिलें आहे. ' उद्योगांत वेळ ज्याचा नित्य जाई, त्याला दैव होई अनुकूल ' असेंहि ते म्हणतात. पण सर्वांत जास्त आकर्षण त्यांना होतें तें बुद्धीचें. केशवसुतांच्या मनांत उपजत बंधुप्रेम तर होतेंच. पण ' आपला बापू चपलधी असल्याने त्याच्याविषयी मम मनीं अति लोभ राहे ' असें ते म्हणतात.

ते आर्य ऋषि देह जावो अथवा राहो या भावनेने सृष्टि पाहण्यासाठी धड-पडत होते. गेल्या शतकाच्या अखेरीस या देशांत काय भयंकर परिस्थिति होती हें पाहावें आणि मग त्या अतिप्राचीन काळीं काय अवस्था असेल याची कल्पना करण्याचा प्रयत्न करावा. रॅगोजिन लिहितो, " हिंदुस्थानांत जितके साप आहेत तितके इतरत्र कुठे नाहीत. आणि हिंदुस्थानांत साथीच्या रोगाने लोक जसे मरतात तसेच जवळ जवळ साप चावून मरतात! १८७७ सालीं ८११ पौंड बक्षीस म्हणून देऊन १,२७,२९५ साप मारण्यांत आले तरीसुद्धा १६,७७७ माणसें साप चावून मेलींच. १८८२ सालीं १९,५१९ माणसें अशीं मेलीं. त्याच वर्षी वाघ, चित्ते, कोल्हे आणि इतर वन्य श्वापदांनी २६०६ माणसें खाल्लीं! " त्या प्राचीन काळीं तर नरभक्षक राक्षसहि होते. म्हणूनच ' त्या दुष्ट नरभक्षकांचें निसंतान होऊं द्या ' असें ऋषि म्हणतात. ( १·२१·५. ) पण त्या ऋषींच्या विश्वसंचारावर याचा परिणाम झाला नाही! त्यांच्या माता प्रेमाने त्यांना अडवीत असतील. म्हणूनच जणू कांही ते म्हणतात, " कल्याणकारक स्तोत्रें आणि अर्कगीतें ह्या यज्ञांत महापराक्रमी विष्णूला स्तवोत. तो लांब चालणारा आणि वेगवान् आहे. त्याला दिशारूपी तरुण माता प्रतिबंध करीत नाहीत. ( ३·५४·१४· ) " ब्राह्मणवेषधारी इंद्राने रोहिताला केलेला उपदेश या ठिकाणीं ध्यानांत येतो. " माणूस बसला की त्याचें दैवहि बसतें. तो निजला की तें निजतें. तो चालूं लागला की तेंहि चालूं लागतें. प्रवास करा! प्रवाशाला मधु मिळतो; प्रवाशाला गोड अंजीर मिळतात. सूर्याचें सुख पाहा. तो न कंटाळतां चालत असतो. प्रवास करा! " ( वेदिक इंडिया, पृ. ४११. ) पुढे प्रभु रामचंद्रांनी वनवासाच्या निमित्ताने

केवढा प्रदेश पादाक्रांत केला आणि त्यांना ऋषींचे आश्रम कुठे कुठे लागत गेले, हें या दृष्टीने पाहण्याजोगें आहे. केशवसुतांना स्वतःला सृष्टिशोभा पाहत एकाकी चिंतन करीत फिरण्याची किती आवड होती, हें आपण पाहिलेंच. कवीचें हें कार्यच आहे असें त्यांचें मत दिसतें.

**आहे तुला सर्वहि सृष्टि मोकळी,**
**व्योमांतली सर्वहि तेंवि पोकळी;**
**संचार कीजे तरि तूं स्वमानसें,**
**कोठे जराही प्रतिबंध तो नसे.**

ऋषींच्या मनांत जिज्ञासा कां होती आणि ती किती तीव्र होती हें यावरून स्पष्ट दिसतें. या जिज्ञासेचें स्वरूप पाहणें जितकें मनोरंजक त्याहून उद्बोधक आहे. ' हा ( सूर्य ) आधारहीन आणि बंधन नसलेला खाली किंवा वर जातांना पडत कसा नाही ? तो कोणत्या शक्तीने चालतो ? कोणीं त्याला पाहिलें आहे ? ( ४.१३.५. ) ज्यापासून द्यावापृथ्वी निर्माण झाली तो वृक्ष कोणता बरें ? आणि कोणच्या वनांत उत्पन्न झाला ? हे विद्वान लोकहो, तुम्ही मनःपूर्वक याचा विचार करा व जेथे जग उत्पन्न केलें त्याचाहि मनांत विचार करा. ( १०.८१.४. ) जेव्हा म्हणजे मूळारंभीं असत् नव्हतें आणि सत्‌हि नव्हतें, अन्तरिक्ष नव्हतें आणि त्यापलिकडेच जें आकाश तेंहि नव्हतें, ( अशा स्थितींत ) कोणीं कोणाला आवरण घातलें ( म्हणावें ) ? कोणाच्या सुखासाठी ? अगाध व गहन पाणी ( तरी ) होतें काय ? ( १०.१२९ १. ) तर तीं ( उदकें ) प्रथम उत्पन्न होऊन किती काळ लोटला असावा बरें ? ( २.३०.१. )' इत्यादि. त्यांचें दुःख होतें तें हें : ' देवाकडे नेणारा मार्ग कोणता, हें खरोखर कोणीं जाणलें आहे ? कोणीं येथे सांगितलें आहे ? देवांचें श्रेष्ठ प्रकारचें व गूढ असें जें वर्तन आहे, त्याचा वरवरचा भाग मात्र आमच्या दृष्टीस पडतो. ( ३.५४.५. ) ' त्यांची दृष्टि विशाल, उत्तुंग असूनहि ते हें म्हणतात ! त्यामुळे, तत्काळ पान्हवणाऱ्या धेनूला तिच्या वासराने दोहनासाठी हाक मारावी त्याप्रमाणे विश्वात्म्याला हाक मारून ते म्हणतात, " तुझें अंतःकरण दयाशील तर खरेंच, पण त्या अंतःकरणाच्या अंतर्भागाची आम्हांस ओळख होऊं दे ! ( १.४.१,३. ) " त्या विगतभय आर्यांना शेवटी सर्वस्व वेचूनहि देवांशीं

सख्यत्व करायचें होतें तें ह्यासाठी. साहजिकच ते म्हणूं लागले, "मी मनाचा निष्कपट, परंतु पडलों अज्ञानी; तेव्हा देवांचीं हीं जीं स्वरूपें गूढ आहेत तीं कशीं आहेत तें विचारतों. ज्या कोणाला हें खरोखर माहीत असेल त्याने आता विलंब न लावतां सर्व सांगून टाकावें. (१.१६४.५,७.)" यांतील 'ज्या कोणाला' या शब्दांचा अर्थ लक्षांत घ्यावा तितका थोडाच नाही काय ? त्यांच्या मनांत अनंत प्रश्न विचारण्याची बुद्धि होती म्हणूनच ते म्हणतात, "शहाणे मूर्खाला हसत नाहीत (३.५३.२३.)" आणि अशाहि शंका घेतात की, 'असा तो उग्र इंद्र आहे तरी कोठें ?' (२.१२.५.) हा इंद्र नाहीच असेंहि कांहींना वाटल्याचा उल्लेख त्याच ठिकाणीं आहे ! प्रश्न विचारतांना त्यांची भावना असे : "सूर्य किती आहेत ? अन्तरिक्षें किती आहेत ? हे पितरहो, तुम्हांला मी स्पर्धेने विचारीत नाही. तर जाणत्या अशा तुम्हांला सरळपणाने विचारीत आहें. (१०.८८.१८.)" आणि आपल्या म्हणण्या-विषयी दुसऱ्याचें मत समजावून घेण्यास ते आतुर असत त्यामुळे विनंती करीतः "ह्या-माझ्या बोलण्याविषयी (तुम्हांला) काय म्हणायचें आहे ? (४.५.८)" आर्य लोक सश्रद्ध होते, पण त्यामुळे त्यांनी विचारीपणा मुळीच सोडला नव्हता हें नमूद करून रॅगोजिन लिहितो, "हें अगदी खरें की ते लोक सुखासाठी धडपडत नव्हते, तर केवळ अंतिम सत्यासाठी !" केशवसुतांच्याहि मनांत याच प्रकारचे मूलभूत प्रश्न उपस्थित होत होते. 'आहे जीवित काय ?' हा विचार त्यांच्या मनांत या वृत्तीमुळेच आला. 'होते हिमबिंदु सकाळीं, कोठे ते सायंकाळीं ?' हा प्रश्न त्यांच्या मनांत फडा काढून उभा राहिला. 'हवेंतुनी हे पडतात शब्द पाही । कुठें जातों हें मला कळत नाही' या जाणिवेने ते अंतर्मुख बनले. 'कोणीकडून ? कोणीकडे ?' याचें चिंतन ते करूं लागले. पण ही जिज्ञासा केवळ दृश्य जगापुरती मर्यादित नव्हती. सृष्टीचें खरेंखुरें रहस्य त्यांना हवें होतें. जें दिसत नाही तेंहि त्यांना पाहायचें होतें. म्हणूनच 'म्हातारी' पाहतांच त्यांच्या मनांत आलें—

**अज्ञातामधला—मूर्त तूं गमसी ध्वनि मजला**
**अर्थ तुझा कोण—मला तो देइल सांगोन ?**

मनांत प्रश्न आल्यावर, त्याचें उत्तर मिळाल्यावर काय होईल असा विचार येऊन जातोच.

**कळेल जर मज तो—तर जगीं भरला जो दिसतो**
**मी तो अंधार—लोपवूं झटेन साचार !**

या सर्व प्रश्नांचा केशवसुतांनी जो विचार केला आहे तो वैदिक परंपरेला धरूनच आहे. वैदिक परंपरा म्हणजे ठराविक विचारांचें एखादें भेंडोळें, असें मुळीं नाहीच. ' जगांतून सगळीकडून थोर विचार आमच्याकडे येवोत ' (१.८९.१) अशीच त्या ऋषींची तळमळ होती. वेद म्हणजे ज्ञान.

**अज्ञेयावरतीं जसें क्षणिक हें अस्तित्व हो खेळतें !**

अशा कांही चरणांवरून केशवसुत अज्ञेयवादी, म्हणजे अश्रद्ध, म्हणजे वेदांताचें वावडें असलेले, असें म्हणणें योग्य होईल असें वाटत नाही. एक तर, याच्या पुढल्या चरणांतच ' वारिस्थ देवीगणीं ' असा उल्लेख आहे, तो वैदिकच नाही काय ? दुसरें असें की, वेदांतच शेवटीं ' या विश्वाचें रहस्य काय आहे कळत नाही ' अशा आशयाचे उद्गार आहेत. प्रा. श्री. म. माटे ' श्रीरामदास-स्वामींचें प्रपंचविज्ञान ' या ग्रंथांत हें रहस्यग्रहण असें करतात, " ऋग्वेदांतील नासदीय सूक्त आमच्या तत्त्वज्ञानाचें खरोखरीच आदिस्थान आहे. त्या सूक्ताच्या शेवटीं शेवटीं आलेला विचार फार बारकाईने पाहावयास हवा. तेथे असा प्रश्न उपस्थित केला आहे की विश्वसंस्थेचा हा पसारा कसा आणि कोठून झाला ? हें त्या अध्यक्षाला — म्हणजेच देवाला — तरी माहीत आहे काय ? आणि उत्तर दिलें आहे की, ' त्याला कदाचित् माहीत असेल किंवा नसेलहि '. हीच संदेहाची भावना आमच्या तत्त्वज्ञानाचें खरेंखुरें बळ आहे." वेदांतील हा विचार अत्यंत विस्मयजनक आहे, असें रॅगोजिनलाहि वाटतें. आणि खरोखरच हा विचार पाहून कोणत्या विचारी माणसाला धक्का बसणार नाही ?

पण ' कदाचित् उत्तर मिळणार नाही ' अशी कल्पना आल्यावर तर ते आर्य ऋषिवर्य अधिकच विचारी बनले, आणि सृष्टीचे अमृतध्वनि ऐकण्यासाठी जिवाचा कान करूं लागले, आणि ज्याला कुणाला ते ऐकूं आले असतील त्याच्याकडून ते समजावून घेण्याचा प्रयत्न करूं लागले. सृष्टि ही त्यांना अत्यंत गूढरम्य वाटल्याने त्यांच्या तोंडून गूढगुंजन सहजच बाहेर पडलें. म्हणूनच ऋग्वेदांत अनेक ठिकाणीं कोडेंवजा कविता आढळतात. कोड्यांत लिहिणें ही वेदांची एक शैलीच आहे, असेंहि कुणाकुणास वाटतें. पण आपण द्यावापृथ्वीचीं लेंकरें असल्याकारणाने त्यांचे नियम समजावून घेण्याची बुद्धि त्यांच्या मनांत

बळावली. यासाठी असामान्य बुद्धीची आवश्यकता लागणारच. म्हणूनच ते प्रार्थू लागले, “ जो आमच्या बुद्धीला प्रेरणा करतो, त्या सूर्यदेवाच्या श्रेष्ठ तेजाचें आम्ही ध्यान करतों. ( ३ ६२·१०· ) बुद्धीच्या प्रकाशाने ज्ञानाच्या महासागराची ती ( सरस्वती ) आम्हांस स्पष्ट कल्पना करून देते. तसेंच या विश्वामध्ये बुद्धि म्हणून जेथे जेथे आढळते तेथे तेथे साम्राज्य करणारी अधिष्ठात्री हीच होय. ( १·३·१२· ) ” केशवसुतांनीहि ‘ विद्याप्रशस्ति ’ करून ज्ञान, शारदा, सरस्वती यांची महती गायिली. ज्ञाताच्या कुंपणावरून उड्डाण करून प्रकृतिपुरुषांची लयबद्ध सौंदर्यमय क्रीडा अवलोकन करावी आणि अवकाशाच्या ओसाडींतील मुके पडसाद सत्वर साकार करावेत अशी त्यांची मनीषा होती. या दिव्य हेतूनेच ते ज्ञानाकडे पाहत होते. केवळ सत्यावर प्रेम करण्याची वृत्ति यामुळे आपोआपच निर्माण होते. म्हणूनच ऋषि गातात, “ ( देवांनो, तुमच्या रथाच्या शब्दाबरोबर ) सत्य आणि मधुर अशा तत्त्वाचा लाभ होणार अशी आशा वाटूं लागते. ( १·२२·३· ) ” आणि केशवसुत ‘ विद्यार्थ्यांप्रत ’ स्पष्ट करतात—

**परी किरण जो तुजमध्ये सत्याचा**
**प्रकाश सर्वोत्तम तो आहे त्याचा !**

काव्यप्रतिभा वेगळी आणि शास्त्रीय दृष्टि वेगळी अशी ऋषींची कल्पना होती असें वाटत नाही. सत्य हेंच त्यांना सुंदर आणि मंगल वाटत होतें. त्यांच्या मतें ज्ञान आणि काव्य यांचेंहि इतर सृष्टीप्रमाणेच अद्वैत असल्याचें दिसतें. अशा त्या ऋषींना जें कांही दिसलें होतें तें थक्क करणारें आहे. उदाहरणार्थ : “ अग्नीने दिसण्यांत चल, परंतु वस्तुतः अचल आकाशाचा तेजोरूप आणि विस्तीर्ण प्रदेश कसा ओतप्रोत भरून टाकला आहे. ( १. १४६.१. ) ” उष्णता आणि आर्द्रता यांच्या संयोगाने विश्वांतील जीवनतत्त्व निर्माण झालें या वैदिक विचाराने रॅगोजिनला म्हणावें लागलें की, “ अशा रीतीने जगाचें तत्त्वज्ञान ग्रीकांच्या पुष्कळच आधी आर्यांनी सांगितलें एवढेंच नव्हे, तर ग्रीकांच्यापेक्षा फार श्रेष्ठ प्रकारचें ज्ञान त्यांनी सांगितलें. (Thus the ancient Aryas not only preceded the early Greek schools of philosophy in constructing a theory of the world, but greatly surpassed them in wisdom. VEDIC INDIA p. 437.)”

हें विचित्र विश्व म्हणजे गोंधळ नसून सुंदर रचना आहे, या विचाराचा आविष्कार करतांना वेदांची वाणी लाजते, पण तिच्या लज्जेंतच विजय आहे, असें मॅक्समुलरने म्हटलें आहे. हेंच किंचित् बदललें तर म्हणतां येईल की, विश्वाचें नांव घेतांना वेदवाणी लाजते ! 'सूर्य विस्तीर्ण पृथ्वीचें अतिक्रमण करीत नाही' हें ऋषींच्या लक्षांत आलें. (१०.३१.९.) त्यांची खात्री होऊन ते म्हणाले, "हे द्यावापृथ्वीहो, तुमचे नियम सत्य आहेत. (३.५४.३.)" विश्वाचें निरीक्षण करतांना त्यांच्या चित्तांत 'नैसर्गिक' तत्त्व स्फुरलें, "ह्या द्यावापृथ्वी सर्व भूतांना आपल्यामध्ये धारण करितात. मोठमोठ्या देवांनाहि धारण करीत असतां त्या थकत नाहीत. ह्या चराचर सर्व विश्वाचा आणि चालणाऱ्या आणि उडणाऱ्या सर्व भूतमात्रांचा हा एकच अधिपति होय. (३.५४.८.)" आणि मग आपण सृष्टिपुत्र असल्याने सृष्टीचे नियम आणि आपल्या जीवनाचे नियम एकच असले पाहिजेत असें त्यांच्या मनाने घेतलें. सृष्टींतूनच, निसर्गांतूनच नीति उत्पन्न झाली असा त्यांचा निश्चय झाला. ते म्हणाले, "ते (मित्रावरुण) सत्यस्वरूप आणि सनातन नियमांना अनुसरणारे आहेत. जगांत सद्धर्मनिष्ठ तेच आहेत. ते सन्मार्गाने नेणारें, उदार आणि पापी माणसासहि समृद्ध करणारे आहेत. (५.६७.४.) ह्या वरुणाने अरण्यावर आकाश, घोड्यांत सामर्थ्य आणि नद्यांत पाणी उत्पन्न केलें. अंतःकरणांत कर्तृत्वबुद्धि, पाण्यांत अग्नि, द्युलोकांत सूर्य आणि पर्वतावर सोम उत्पन्न केला. (५.८५.२.) हे इंद्रावरुणहो, जें पूर्वीच्या काळीं ऋषींना तुम्हीं विचार, वक्तृत्वशक्ति, गायन आणि ज्ञान दिलेंत आणि यज्ञ करणाऱ्या शहाण्या लोकांनी जीं स्थानें निर्माण केलीं तीं म्यां तपाने जाणलीं. (८.५९.६)" केशवसुतांचेंहि मत असेंच आहे.

> दिव्य शक्तीने स्फुरें गंध पुष्पीं,
> रंग खुलतीही तिने इन्द्रचापीं;
> सृष्टिमाजी जें रम्य असें कांही
> तीच कारण त्या शक्ति असे पाही.

'त्या' हा शब्द येथे 'काव्याला' या शब्दासाठी आला आहे. केशवसुतांच्या दृष्टीने काव्य हें जीवनव्यापी असलें पाहिजे हेंहि येथे लक्षांत येतें. याहूनहि पुढील उद्गार स्पष्ट आहेत —

**प्रीति, चारुता, आनंद**
**सिंचिति सृष्टीचा कंद !**

या तत्त्वांना केशवसुत सृष्टीचे अमृतध्वनि म्हणतात आणि प्राचीन वाङ्मयांत त्यांना श्रुती अशी संज्ञा आहे, हा केवळ योगायोग आहे असें वाटत नाही. ऋषींना हीं तत्त्वें दिसत म्हणून त्यांना द्रष्टे म्हणतात. केशवसुत कवींविषयी म्हणतात—

**म्हणोनि हे नरजातिचे खरे**
**नेत्रकर्णचि नव्हेत का बरें?**

अशा रीतीने विचार करणारे ते आर्य 'एकापासूनच हा सर्व पसारा झाला' या निर्णयाला आले (८·५८·२·) आणि मग ते लोकांना आवाहन करूं लागले, "हे लोकहो, ज्याने हें सर्व निर्माण केलें त्याला तुम्ही जाणीत नाही. खरोखर तुमच्या अन्तर्गत ईश्वरतत्त्व कांही वेगळेंच आहे. (१०·८२·७·)" केशवसुत म्हणतात —

**सृष्टिकेंद्र तो कवण्या ठायीं**
**ज्याच्या त्याच्या आहे हृदयीं !**

मानवी वंशाचा जन्म स्वर्गांत आणि तेजांत आहे, असा ऋषींचा विश्वास होता, असें रॅगोजिनहि म्हणतो. केशवसुतांचा विचार तोच आहे.

**"चंद्र आणि नक्षत्रें तीं शोभलीं जेथ वा रातीं**
**उजेडही जेथुनि येतो पाउसहि जेथुनि पडतो**
**तेथुनि हे आले येथे तेथुनीच तूं आम्हांतें !"**

सर्वांच्या जन्माचें कारण एकच असेल तर सर्वांचें एकमेकांशीं नातें काय असणार हें स्पष्टच आहे.

**जिकडे जावें तिकडे माझीं भावंडें आहेत !**

आणि आपल्याला असें कां वाटतें याचें कारण ते हेंच देतात की सर्वत्र सृष्टि एकच आहे. निसर्ग आणि मानव यांचें अद्वैत ऋषींच्या अंतःकरणांत स्फुरलें, "तो महान् देव मर्त्यांत व्यापून आहे.· (४.५८.३.) (देवा,) तुझ्या तेजांत सर्व जगाने आश्रय घेतला आहे. जी मधुर लाट समुद्रांत, अन्तःकरणांत, प्राणिमात्रांत, पाण्यांत आणि संग्रामांत भरलेली आहे, त्या मधुर लाटेचा

आम्ही आस्वाद घेऊं (४.५८.११.)" ही लाट, हा प्रवाह, हाच ओघ केशवसुतांना जाणवला.

तीं माझीं मी त्यांचा, – एकच ओघ अम्हांतुनि वाहे !

स्वतःमधील या तेजांशाची ओळख करून घेणें किती महत्त्वाचें आहे ! म्हणूनच ऋषि म्हणतात, "त्वष्ट्रादेव आमच्या ठिकाणीं जें आश्चर्यकारक तेज आहे, त्याची अशी योजना करो की तेणेंकरून आमचा उत्कर्ष होऊन दिव्य वैभव दिसो. (१·१४२·१०·)" केशवसुत 'विद्यार्थ्यांप्रत' हीच जाणीव करून देतात—

परि तुजमध्ये महतीचें जें बीज
त्याहुनि कांही मोठी नाही चीज

सुदीर्घ, संपन्न आणि यशस्वी अशा आयुष्याची कल्पना ते आर्य करीत. केशवसुत आपल्या कविमित्रास लिहितात —

जगावें तूं वर्षें प्रिय मम कवे ! शंभर पुरीं,
समृद्धी सौख्याची चिर तव वसावी घरभरी,
जन स्वास्थ्यीं तूझीं सुरस कवनें सुन्दर धरी,
भविष्यीं कालीं तें शुचि यश तुझें निश्चल ठरो !

पण माणूस मर्त्य आहे, ही तीव्र जाणीव आर्यांना होती. त्यांनी मानवाला विचार करणारा आणि मर्त्य असेंच संबोधिलें आहे. केशवसुतहि 'म्हातारी'-मध्ये म्हणतात —

तुझे रंगवास – न कळती मर्त्य मानवास

आर्यांना मरायचें नव्हतें हें निश्चित, पण त्यांना मरणाचें भय नव्हतें हेंहि निश्चित. मृत्यूनंतर पितर स्वर्गात सुखांत असतात, असेंच ते मानीत. अमरां-बरोबर तेथे त्यांना अमृत मिळतें असेंहि त्यांना वाटे. केशवसुत कवि या नात्याने 'एका तरुणीस' म्हणतात—

तरी देहत्यागें सुख अनुभवूं आपण वरी !
वनीं त्या देवांच्यासह अमृत तें प्राशन करूं...

देह मर्त्य असला तरी आत्मा अमर आहे. पण लोक केवळ शरीराकडे पाहतात, असें वेदांत म्हटलेंच आहे. (१.१६४.३८.)

मानवतेविषयीचा आर्यांचा दृष्टिकोन नैसर्गिकपणेंच अत्यंत सहिष्णु आणि सर्वसंग्राहक झाला. 'अखिल मानवांविषयीं प्रेमबुद्धि बाळगणारा हा (अग्नि) सूर्यरूपाने झटत असतो' असें त्यांना दिसलें ( १·९८·१ ). प्रेम नैसर्गिक आहे; द्वेष अनैसर्गिक आहे. म्हणूनच त्यांनी प्रार्थना केली, "अश्वीदेवहो, आम्हांस कांही द्याल तर ओजस्वीपणा द्या, द्वेषबुद्धि विलयास न्या. ( १·१५७·४· )". वैदिक आर्यांच्या समाजरचनेविषयी रॅगोझिनने जे विचार मांडले आहेत ते थोडक्यांत पुढीलप्रमाणे : 'पत्नी ही सर्वस्वी गृहस्वामिनी होती. तिच्यावर कुणाचीहि सत्ता नव्हती, सासूसासऱ्यांचीसुद्धा. जातिसंस्था दृढमूल झालेली नव्हती. नरबलीहून जास्त तिरस्करणीय त्यांना कांही वाटत नसलें पाहिजे. त्यांनी आपल्या वंशाचें श्रेष्ठत्व प्रस्थापित केलें तें नैतिक मार्गांनीच. 'भारत' हे विश्वामित्राने आर्य केलेले दुसरे लोक होते; पण ते पूर्णपणें आर्य झाले.' इत्यादि. तर्कतीर्थ जोशी लिहितात, "वैदिक काळीं सामाजिक जीवन निरोगी व प्रसन्न होतें, याचें प्रत्यंतर वैदिक वाङ्मयांत सांपडतें. ऋग्वेदाचे सूक्तकर्ते ब्राह्मण, क्षत्रिय, व वैश्य अशा तीनहि व्यवसायांतले होते. शूद्र हा विभाग ऋग्वेदाच्या उत्तर भागांत सापडतो. शूद्र विभागांतदेखील वैदिक संस्कृति पोचली होती, असें निषादस्थपतींच्या ( गवंड्यांच्या ) व रथकारांच्या यज्ञसंस्थेवरून ज्ञापित होतें. यज्ञसंस्थेंत शूद्राचें स्थान महत्त्वाचें होतें. अश्वमेधासारख्या मोठ्या यज्ञसमारंभांत सूत मागध नट इत्यादि शूद्रव्यवसायी लोक इतिहासपुराणें रचून गाऊन म्हणून दाखवीत असत. स्त्रियांमध्ये सूक्तकार ब्रह्मवादिनी सापडतात." तसेंच सतीची चाल नव्हती आणि विधवाविवाहाला संमति होती, असें स्पष्ट दिसतें. ( १०.१८.८. ) साहित्याचार्य हरदास आपल्या 'वेदांतील राष्ट्रदर्शन' या ग्रंथांत सांगतात, "याप्रमाणे आर्य हा शब्द वंशवाचक असल्याचें व द्रविड नि अनार्य हाहि वंशवाचक असल्याचें व त्यांच्या संघर्षाचें प्रमेय ऋग्वेद व वैदिक वाङ्मयावरून सिद्ध होत नाही. अर्थातच या शब्दांच्या उघड दिसणाऱ्या गुणवाचकत्वामुळे आर्यांच्या रंगरूपादिकांच्यावरून ते भारतांतील मूळ रहिवाश्यांहून वेगळे असण्यासंबंधीच्या कल्पना वेदाच्या आधारें सिद्ध करतां येत नाहीत." आर्यांची स्वाभाविक समाजनिष्ठा यावरून व्यक्त होते. एवढेंच काय, 'हें सर्व जग आम्ही वश करूं, इन्द्र आणि विश्वेदेव आम्हांला साहाय्य करोत ( १०.१५७.१. )' असेंच त्यांचें ध्येय होतें.

समाजांतील अगदी सामान्य माणसाविषयी, कसलेंहि काम करणाऱ्याविषयी आर्यांच्या मनांत आपुलकी होती ती केवळ वरवरची नव्हती. केशवसुतांच्या स्त्रीविषयक भावना वैदिकच आहेत. तसेंच अंत्यजांविषयीं आणि मजुरांविषयी त्यांना सहानुभूति वाटली ती त्यांच्या वैदिक वृत्तीमुळेच; त्यांची सहानुभूति उपजतच, पण या परंपरेचीहि जोड तिला मिळाली, असें दिसतें.

संघशक्तीचें महत्त्व आर्यांना कळलें होतेंच. जग आर्य करायचें तर सामर्थ्य हवेंच, आणि संघशक्ति हेंच श्रेष्ठ सामर्थ्य आहे. ऋषि म्हणतात, "तुमचा अभिप्राय एकसारखा असावा. तुमचीं अन्तःकरणें एकसारखीं असावींत. तुमचें मन एक असावें की जेणेंकरून तुमच्या संघशक्तीची बळकटी होईल. (१०.१९१.४.)". या संघशक्तीचा ऱ्हास हेंच आपल्या अवनतीचें कारण आहे हें केशवसुतांच्या दृष्टीला दिसलें आणि त्यांनी 'तुतारी' फुंकली—

**संघशक्तिच्या भुईंत खंदक**
**रुंद पडुनि शें तुकडे झाले,**
**स्वार्थांनपेक्ष जीवीं अपुले**
**पाहिजेत ते सत्वर भरले;**
**घ्या त्यांत उड्या तर बेलाशक !**

आर्य म्हणजे आदर्शाची ओढ असलेलीं, अल्पज्ञ (म्हणजे नम्र) आणि पूर्ण होऊं इच्छिणारीं मनुष्यें (१०.७.६.), अनार्य म्हणजे वाटेल तसे वागणारे, आणि राक्षस म्हणजे निरपराधी लोकांना, कोणत्याहि कारणाने कां होईना, छळणारे, अशाच आर्यांच्या व्याख्या असाव्यात. अग्नीची प्रार्थना आहे, "हे अग्ने, तूं सर्वांना बघणारा आहेस. मनुष्यांत लपून बसलेल्या राक्षसांस हुडकून काढ व त्यांचीं तिन्ही डोकीं तोड. (१०.८७.१०.)" राक्षस मानवांतच असतात, ते ओळखूं येत नाहीत, पण त्यांचा मोड झाला पाहिजे, हाच याचा अर्थ नाही काय ? म्हणूनच 'देवदानवां नरें निर्मिलें' हें सगळ्या लोकांना पटलें पाहिजे हा विचार केशवसुतांच्या मनांत प्रबळ झाला. ऋषींनी मागणें मागितलें, "दिव्यविबुध आम्हांस असा वीर देवोत की जो मानवजातीचें हित करील, ज्याच्यापासून बांधवांस संतोष होईल." (१.४०.३.) आणि हीच प्रेरणा होऊन केशवसुत उद्गारले —

**शान्तीचें साम्राज्य स्थापूं बघत काळ जो आहे**
**प्रेषित त्याचा नव्या दमाचा शूर शिपाई आहें !**

आर्यांना त्रिवार शांति हवी होती. पण कांही तरी कारणें काढून शांतीला विरोध करणाऱ्यांविरुद्ध योग्य ती उपाययोजना हवीच. म्हणूनच युद्ध करणें भाग पडलें तर ऋषि म्हणतात, “ हे धर्मनिष्ठ शूरा, शत्रूंशीं युद्ध करण्याच्या वेळीं मन उदार ठेव. उद्दाम मनुष्याची पर्वा धरूं नको. हविर्भाग सिद्ध कर ! ( २.६२.२.)” आपलें रक्षण ते देवावर सोपवणारे नव्हते. ते म्हणतात, “ हे इंद्रा, तुझ्यापुढे मुलांसह ( शत्रूंना जिंकण्याकरता ) मी जातों. माझ्या पाठीमागे ( संरक्षणाकरता ) सर्व देव येत आहेत. जर ( शत्रूंच्या संपत्तींत ) माझा भाग असेल तर मला शत्रू जिंकण्याचें सामर्थ्य दे. ( ८.१००.१. )” केशवसुतहि म्हणतात —

**कधी कोणी राष्ट्र प्रबल दुसऱ्याला बुडविण्या**
**जहाजें मोठालीं करिल जरि गे सज्ज लढण्या**
**तरी सांगोनीयां प्रवर वरूणाला, खवळवूं**
**समुद्रा तेणें त्या सकल खलनौका चुथडवूं !**
**गुलामां आणाया निघतिल कुणी दुष्ट नर ते**
**तरी त्यांचीं फोडूं अचुक खडकीं तीं गलबतें !**

हें म्हणतांना केशवसुतांच्या डोळ्यांपुढे काय असावें ?

या ठिकाणीं कुणाच्या मनांत शंका आली की

**ब्राह्मण नाही, हिंदुहि नाही, न मी एक पंथाचा**

असें म्हणणारा माणूस ‘ वैदिक ’ परंपरेंत बसतो काय, तर तिला उत्तर ‘ होय ’ असेंच आहे. स्वामी विवेकानंदच १८९३ सालीं शिकागोला म्हणाले, “ मी एक हिंदु आहें. माझ्या लहानशा विहिरींत मी बसलों आहें. आणि हेंच सर्व जग असें समजत आहें. ख्रिश्चन आणि मुसलमानहि आपपाल्या विहिरींत बसून स्वतःची विहीर म्हणजेच सर्व जग असें त्या बेडकाप्रमाणे समजत आहेत. ” तेव्हा हिंदु हा शब्द क्वचित् संकुचित अर्थानें वापरला जातो असें दिसतें. पण ‘ मी हिंदु नाही ’ असें हिंदु माणूस म्हणूं शकतो कारण त्यामुळे त्याच्या वैदिकत्वाला बाध येत नाही. आणि वैदिकत्व म्हणजेच विश्वधर्म. याचा ग्रंथ कोणता ? स्वामी विवेकानंद सर्वधर्मपरिषदेंत म्हणतात, “ वेद म्हटलें म्हणजे कोणत्याहि ग्रंथाचा बोध होत नाही. वेद म्हणजे निरनिराळ्या लोकांनी निरनिराळ्या

काळीं शोधून काढलेल्या आध्यात्मिक नियमांचा ( Spiritual Laws ) संग्रह होय. गुरुत्वाकर्षणाचा नियम त्याच्या शोधापूर्वी अस्तित्वांत होताच, आणि सगळीं माणसें विसरलीं तरीहि तो राहणारच; तसेंच आध्यात्मिक विश्वाचें नियमन करणाऱ्या नियमांचें आहे." म्हणजे दृश्य आणि अदृश्य सृष्टि हाच या धर्माचा ग्रंथ होय. हाच धर्म खरा, कायम टिकणारा आणि थोर आनंद देणारा आहे हें उघड आहे.

आर्यांचा हा धर्म त्यांना जीवनावर प्रेम करायला प्रवृत्त करीत होता. त्यामुळे जीवनांतील सर्व उत्कट आणि उदात्त भावना अनुभवाव्या, असें त्यांना वाटत होतें. म्हणूनच वात्सल्य, मित्रप्रेम इत्यादींचीं संस्मरणीय वर्णनें वेदांत आलेलीं आहेत. जीवनाकडे पाहण्याची त्यांची रसिकताहि अतिशय मनोरम आहे. ऋषि म्हणतात, "हे वायुदेवा, प्रियतमा निद्रावश असतां तिचा प्रियकर तिला हळूच जागी करतो त्याप्रमाणे आमच्या अंतःकरणांतील उच्च कल्पना जागृत कर. ( १.१३४.३. )" याच सौंदर्यशोधक दृष्टिकोनांतून केलेली वाणी, उषा वगैरेंचीं वर्णनें मुळांतूनच वाचलीं पाहिजेत! आर्यांचें 'गोजिऱ्या' मुलांवर आणि संसारावर मनापासून प्रेम होतें. एके ठिकाणीं तर ते ईश्वराला म्हणतात की, तुमची घरीं वाट पाहिली जात असेल तेव्हा इथे ताटकळतां कशाला? जोडा लौकर रथाला घोडे आणि त्वरा करा. इतर वेळीं आदर्शाच्या ओढीने तळमळणाऱ्या आर्यांना या वेळीं कसली ओढ होती, हें सांगायला नको. पण ते म्हणतातच, "हे तेजस्वी पूषन्‌देवा, शुद्ध तुपाप्रमाणे हा पिळलेला सोम तुझ्याकडे जातो. आम्हांला स्त्रियांकडे पोचीव. ( ९.६७.१२. )" अश्वींची स्तुति करतांना ते गातात, "जसें तरुण युवतींचें बोलावणें स्वीकारतात, त्याप्रमाणे उत्सुकतेने तुम्ही आमची स्तुति स्वीकारा." देवांना स्तुति प्रिय; कवींना कविता प्रिय. म्हणून केशवसुत हाच दृष्टान्त देतात—

**युवा जसा तो युवतीस मोहे**
**तसा कवी हा कवितेस पाहे !**

ऋग्वेदांत लोपामुद्रेला पाहून अगस्त्यऋषींच्या मनांत उत्पन्न झालेली अस्वस्थता केशवसुत म्हणतात तशीच आहे. ( १.१७९. )

**प्रिये, माझ्या उच्छृंखल करूनिया वृत्ति सगळ्या,**
**तुझ्या गे भासाने कवनरचनेला वळविल्या.**

अगस्त्य म्हणतात, "मीं पुष्कळ वर्षे रात्रंदिवस एकसारखे कष्ट सोसलेले आहेत; आणि वृद्धदशा ही तर शरीराचा मोहकपणा पार नाहीसा करीत असते. असें असूनहि पुरुषांनी स्वस्त्रीसमागमसुख अनुभवूं नये काय ?......आपण सर्व प्रतिस्पर्ध्यांवर जयहि मिळविला आहे. तुम्हीआम्ही दोघेजण एकमताने वागत आलों आहोंत. तर इहलोकीं ज्यापासून शेकडों लाभ होतात असा संसाराचा पणहि आपण खास जिंकलाच. एखाद्या महानदाला अडवलें असतां तो जसा अनावर होतो, त्याप्रमाणे मला उत्कंठा झाली आहे. येथूनतेथून सर्व तऱ्हेने मी उत्कंठित झालों आहें. मी वीर्यवान्, मोठा बुद्धिमान् व धैर्यबलशाली असून, ही लोपामुद्रा तर जातीची अबलाच, पण हिने मला सर्वस्वी विव्हल केलें आहे. मी जोराने श्वासोच्छ्वास करीत आहें, पण मला ती शोषूनच टाकीत आहे...मनुष्यप्राण्याला शेकडो वासना असणारच!... " केशवसुतहि प्रीतीचा उद्वेग असाच व्यक्त करतात, "वेडापीरच जाहलों जिवलगे आहें वियोगामुळे!...विरही मी पीडित झालों हृदयीं उत्कंठा अनलें...तेणें मी विव्हल भारी... " इत्यादि. बायकाविषयी बोलणें बिलकूल न खपण्याइतकी केशवसुतांची संयमी वृत्ति, त्यांचें पत्नीप्रेम, त्यांचा व्यवसाय, त्यांचे संस्कार, तत्कालीन चालीरीति वगैरे गोष्टी लक्षांत घेतां, त्यांनी अशा प्रकारचे उद्गार काढावेत हें एकदम पाहिलें तर आश्चर्यच वाटतें. परंतु वैदिक वाङ्मयांतील रसिकता पाहूनच, अशा भावनांचा आविष्कार करण्यांत काय गैर आहे, असा विचार त्यांच्या मनांत आला असला पाहिजे . वेदांतील जीवनक्रम अक्षरशः नैसर्गिक होता. केशवसुतांनाहि प्रीति निसर्गांतच दिसते. 'प्रीति जगाचें वसन विणितसे' हें तत्त्व सांगतांना ते म्हणतात—

**मेघ विजेला नभीं सोडुनी खालीं ये, परि तो**
**रविदीप्तीच्या दिव्यरथीं तिज भेटाया वळतो !**

समुद्रशोभा पाहणाऱ्या स्त्रीस ते 'अहा! गे सृष्टीच्या वरतनु सुते!' असेंच संबोधितात. 'मनोहारिणी' म्हणजे 'सृष्टिलतेची कलिका फुलली' अशीच कल्पना स्वाभाविकपणेंच त्यांच्या मनांत येते. मीतूंपणाचा विसर पाडणारें आणि 'हृदय माझें तव उरीं हाल्ताहे' असेंच अद्वैतप्रेम त्यांना हवें होतें. याच अद्वैताचें ते भावमय वर्णन करतात —

**तेणें व्याकुल होउनी झडकरी मी झांकितों लोचनें;**
**माया—ईश्वर, पुरुष-प्रकृतिही, वागर्थ, ऐशीं द्वयें**
**सम्यग्युक्त, बघून आंत, उघडीं त्रासून मी ईक्षणें,**
**तों नित्य द्युतिदेवतेसह रमे तो दृग्पथीं सूर्य ये !**
**त्यायोगें विरहाग्नि फार भडके ! — होतें नकोसें जिणें;**
**आता हाय ! न राहवे तुजविणें, कैसे करूं गे सये !**

केशवसुतांनी या ' वियुक्ताचा उद्गार ' या कवितेचें हें पाठांतर कां केलें असावें ? त्यांचें आपल्या अमृतपरंपरेवरील असलेलें स्वाभाविक प्रेम हेंच याचें कारण नाही काय ? केशवसुतांच्या प्रीतिविषयक भावनांचा विचार करतांना, अन्तःकरणपूर्वक करावयाच्या कर्तव्यावर त्यांनी दिलेला भरहि लक्षांत येतो आणि त्यांच्या या विषयावरील विचारांची उंची लक्षांत येते. ' प्रियेला सादर केलेली पुष्पमाला किंवा कर्तव्य आणि प्रीति ' या कवितेंत हा विचार मांडून ते सृष्टीचें तत्त्व सांगतात —

**अन्याने न अपेक्षिलें प्रियतमे ! जें आपणापासुनी,**
**तें सद्वर्तन दावितां सहज तो जातो मनीं मोहुनी,**
**त्याच्या गे हृदयांत नंतर उठे उद्वेग तो प्रीतिचा;**
**ऐसा आपण पाहतों नियम हा कान्ते ! सदा सृष्टिचा !**

अशीं सृष्टीचीं तत्त्वें सांगणारे ते कवि. दृश्य आणि अदृश्य सृष्टीच्या अभ्यासांतून आणि चिंतनांतून ऋषींना शास्त्रीय आणि धार्मिक तत्त्वें स्फुरलीं; त्यामुळे त्यांना जो दिव्य आनंद झाला त्यांतूनच त्यांना कलेचाहि साक्षात्कार घडला. त्याचाच आविष्कार त्यांनी काव्याच्या आणि गायनाच्या द्वारें केला. त्यांना कोणत्या गाण्याचा नाद होता ? " मन तल्लीन झालें असतांना रचलेल्या प्रार्थना जेव्हा बुद्धिवान् ( भक्त )जन ( प्रेमाने ) गात बसतात त्या वेळीं त्यांस ह्या जगांत देवाचें ज्ञान होतें. ( १·६७·२. ) " त्यांचें गाणें कसें होतें ? " ऋत्विज सर्वांगसुंदर गायनाचे आलाप खड्या सुरांत काढीत असतो. ( १.१४४·१.) " तें गाणें ऐकतांना, गातांना त्यांना काय वाटे ? " गायनांचा घोष द्युलोकापर्यंत जाऊन पोहोचतो. ( १·८३·६ ) " अशा रीतीने आर्यांची कला नैसर्गिकपणेंच उद्भवलेली आणि सत्य, सौंदर्य आणि स्वर्गीयता यांच्या सान्निध्यांत राहूं इच्छिणारी होती. ही सृष्टीच गात आहे असें केशवसुतांनाहि वाटतें.

**वयस्या, गाते ही मृदुघनरवें सृष्टि मधुरं !**

त्यांना ' गाणारे शब्द ' केव्हा मिळतील अशी आस लागलेली होती..

**वाग्देवी शारदे गे ! फिरुनि अपुले शब्द पाचार येथे**
**साहाय्यावीण त्यांच्या भजन तव कसें सांग साधेल मातें ?**
**हृदय आत्म्याला जधी आळवीतें;**
**तधी तुमचें तें नको कलाज्ञान,**

असें ते म्हणतात, तेव्हा कला ही नैसर्गिक असावी, उत्स्फूर्त असावी यावरच ते भर देतात; कारण अशीच कला स्वर्गीय बनते, स्वर्गापर्यंत पोहोचते आणि मग तेथील तारका म्हणते—

**" तुझीं गीतें परिसून मी प्रसन्न !**
**तुझ्या दिव्यत्वापुढे जग भिकारी ! "**

ज्या वाणीने हें काव्यगायन करायचें तिचें वर्णन वेदांत केलें आहे — ' तेव्हा ( देवांनी व ऋषींनी ) वाणीस गंधर्वांकडे पाठविलें. वाणी गायत्री वगैरे छंदांच्या रूपाने देवांकडे गेली. तेव्हा तिने पक्ष्याचें रूप घेतलें होतें. आणि तेथून तिने सोम आणला. ( मंडल ९ ) '. याच दिव्य वाणीच्या दृश्य स्वरूपाला म्हणजे गाणाऱ्या शब्दांना केशवसुत ' शब्दांनो ! मागुते या ! ' अशी हाक मारतात; कारण त्यांना आपल्या मनःचक्षूंसमोर ती अतिसुंदर पक्षिरूप वाणी दिसते—

**तेजाचे पंख वाऱ्यावरि हलवित ती चालली शब्दपंक्ति !**

या वाणीने स्वर्गीय सोम आणला, असें जें वर्णन केलें आहे, त्यांत केवढा अर्थ आहे ! आणि केशवसुत हर्षभराने हाच सोमाचा रस मागत आहेत !

ज्ञान-धर्म-कला यांचें अद्वैत ऋग्वेदांत स्पष्ट आहे. दिव्यैश्वर्यमंडित इंद्र अचिंत्य वाटतो पण एकाग्रतेने त्याचें ध्यान केलें पाहिजे असें सांगून ऋषि म्हणतात, " तीव्र प्रेरणेने स्फुरलेल्या सत्यार्थबोधक सूक्ताचा तुज इन्द्राशीं योग होवो. ( १·१२९·७. ) " कवि गूढ अर्थ उकलीत असतो ( ४·१६·३. ) म्हणून त्याला विचारतात, " उदकपूर्ण असणाऱ्या ह्या नद्या ' अलला ' असा शब्द करीत गर्जत चालल्या आहेत. हे ऋषे हें काय म्हणतात तें ह्यांना तूं विचार. उदक कोणत्या आवरक मेघाला फोडीत आहे ? ( ४·१८·६. ) " अशा रीतीने

कवि हा सृष्टीचीच भाषा बोलत असतो, आणि ज्ञान-धर्म-कला प्रकट करीत असतो, म्हणूनच केशवसुत म्हणतात —

**तो गम्भीर वदे रवा, तर, मुक्या पृथ्वीस या वाटतें**
**कीं, " मातें श्रुति लक्षसंख्य फुटल्या " आणीक ती ऐकते !**

हें गूढ उकलण्याचें गहन कार्य करणें कवींना शक्य होतें कारण त्यांना दिव्य मार्गदर्शनहि लाभतें. ऋषींचा संबंध देवापर्यंत पोचतो. ( १.१३९.९. ) एवढेंच काय, देवापासून ऋषि झाले. ( १.१६४.१५. ) केशवसुतांच्या काव्यांत तारा दिव्याला सांगतो —

**ज्ञाते, आणि भविष्यवादिहि, कवी, ते चित्रकर्ते तसे**
**मत्तेजें फिरतात, अन्य जन हे तूझ्या प्रकाशें जसे.**

असे हे कवि देवांचे आणि सृष्टीचे लाडके असतात हें काय सांगायला पाहिजे ? इंद्र हा अंगिरा ऋषींचा कैवारी आहे. ( २.११.२०. ) पूर्वी त्या थोर नद्या ऋषीस म्हणाल्या, " हे स्तोत्या, आम्ही तुझें म्हणणें ऐकतों. ( कारण ) तूं गाडींत आणि रथांत बसून दुरून आला आहेस. आम्ही तुझ्याकरता खालीं वांकतों. आई मुलाला पाजण्याकरता किंवा मुलगी बापास नमस्कार करण्यास लवते त्याप्रमाणे तुजकरता मी नमतें ! ( ३.३३.१०. ) " केशवसुतांचे उद्गार प्रसिद्धच आहेत —

**आम्ही कोण म्हणूनि काय पुससी ? आम्ही असूं लाडके**
**देवाचे, दिधलें असें जग तयें आम्हांस खेळावया;**
**विश्वीं या प्रतिभाबलें विचरतों चोहींकडे लीलया,**
**दिक्कालांतुनि आरपार आमुची दृष्टि पहाया शके !**

असें असल्यामुळेच —

**दृष्टी तो फिरवी वरी, तर लवे आकाश तें खालती !**

आपल्या या दिव्य दृष्टीमुळेच भयंकर वाटणाऱ्या गोष्टींतूनहि तो तत्त्वें शोधून काढतो, म्हणूनच —

**श्वासोच्छ्वास करी परी नवल हें – जीवित्वसंहारक**
**वायू घेउनि आंत, तो त्यजितसे वायूस त्या पोषक !**

अशा रीतीने सृष्टीचीं तत्त्वें म्हणजे सृष्टीची नाडीच कवींच्या करांत वाहत

असते; जीवन कसें रचावें हें त्यांना अवलोकन – मनन – कल्पना – चिंतन इत्यादींच्या द्वारें ज्ञात झालेलें असतें. साहजिकच त्यांची पात्रता आणि सामर्थ्य विलक्षण वाढलेलें असतें. अशा ऋषींवांचून जग चालूं शकणार नाही, असें म्हटलें तर त्यांत अतिशयोक्ति किती असणार ? वेदांत म्हटलें आहे, " कवींना ते कवि कसे झाले तें विचार. मनस्वी आणि सत्कृत्यें करणारे असे ते कवि द्युलोक तयार करते झाले. ( इंद्रा ) हीं आम्हीं तयार केलेलीं, तुझें महत्त्व वाढविणारीं व मन प्रसन्न करणारीं अशीं स्तोत्रें तुझी धारणा करोत. त्यांनी येथे सर्व तऱ्हेने गूढ कृत्यें करीत द्यावापृथ्वींना बळकटी आणली, द्यावापृथ्वीला मापांनी मर्यादा उत्पन्न केली आणि द्यावापृथ्वीच्या धारणे-करता मध्ये अंतरिक्ष उत्पन्न केलें. ( ३.३८.२,३. ) अंगिरसांनी स्तोत्र-घोषाने पर्वताचा भंग केला. त्यांनी आमच्याकरता विस्तीर्ण द्युलोकाकडे जाण्यास मार्ग तयार केला. आणि दिवस, स्वर्ग, दीप्ति आणि उषःप्रकाश ह्यांचा लाभ करून घेतला. ( १.७१.२. ) हे इंद्रदेवा ! राक्षसांना ठार करणारे पराशर – शक्ति – वसिष्ठप्रभृति ऋषि तुझी कृपा मिळविण्याच्या बुद्धीने घरामध्ये तुला प्रसन्न करतात. ( ७.१८.२१. ) " अशा ऋषींची जगाला अत्यंत आवश्यकता आहे, हें सांगायला नकोच. म्हणूनच म्हटलें आहे, " ह्या ऋषिमंडळीच्या योगाने आम्हांला सहस्रावधि लाभ होवोत. ( १. १८९. ८. ) " परंतु मानवच काय, इंद्रहि ऋषींना म्हणाला, " वृत्रासुराच्या ब्रह्महत्येच्या पातकापासून सामगायन करून ( मला ) शुद्ध करा. ( ८. ९५. टीप. ) " कवींची पात्रता एवढी असल्यानेच केशवसुत म्हणतात—

**चाले तो धरणीवरी तर पहा ! जेथूनि तो चालिला**
**धूलि तेथिल होतसे कनकिता !–घेऊं नका भ्रान्तिला.**

कवींच्या हृदयांत प्रतिभेचा संचार झाल्याबरोबर त्यांच्या—

**दैत्यांचें बल देवसत्त्वाहि तसें अंगीं चढे त्या क्षणीं**

आणि त्यांच्या तोंडून दिव्य वाणी बाहेर पडते; मग—

**त्याच्यांतून भविष्यवाद निघती, ऐकून ते सादर**
**ब्रह्म्यातें क्षमता नवीन-रचना-कार्य क्रमीं लाभते !**

म्हणूनच केशवसुत आकाशवाणी व्हावी तसे बोलतात—

**ते आम्हीच सुधा कृतींमधुनिया ज्यांच्या सदा पाझरे**
**ते आम्हीच शरण्य मंगल तुम्हां ज्यांपासुनी लाभतें !**
**आम्हांला वगळा – गतप्रभ झणीं होतील तारांगणें**
**आम्हांला वगळा – विकेल कवडीमोलावरी हें जिणें !**

केशवसुतांच्या एकंदर काव्याचें स्वरूप भावकाव्याचें आहे, हें स्पष्ट आहे. हेंच कवींचें एक प्रमुख कार्य अशी ऋषींची कल्पना असल्याचें दिसतें. "एखादा कवि ज्याप्रमाणे कोमल अंतःकरणवृत्तींची आपणांस ओळख करून देतो, त्याप्रमाणे जगांतील सौंदर्याची ओळख उषेनेच आपणांस करून दिली आहे. (१. १२४. ४.)" बालपणांतील मनाची कोवळीक जतन करणें, प्रेमळपणा कायम टिकवणें हें कवीचें ब्रीद आहे, असें केशवसुत म्हणतात.

**प्रौढत्वीं निज शैशवास जपणें बाणा कवीचा असे.**

कवि हे प्रेमळ लोकांतहि विशेष प्रेमळ असतात, असें वेद सांगतातच. (१. १२९.१.) काव्य कसें असावें ? वेदांत म्हटलें आहे, "हे मरुत् देवांनो, गौतमाने जें स्तोत्र गायिलें तें इतकें यशस्वी होतें की, कोणत्याहि दुसऱ्या स्तोत्राने इतकी खळबळ उडवून दिली नाही ! (१. ८८. ५.)" केशवसुतांनी आपल्या अनेक कविता खळबळ उडावी म्हणून लिहिल्या असें वाटतेंच. पण त्यांच्या सर्व काव्यानेच खळबळ उडवून दिली ! ऋषि म्हणतात, "हे बलिष्ठा, जे तूं नवीन पराक्रम करशील ते आम्ही यज्ञांत वर्णन करूं. (५. २९.१३.)" केशवसुतहि पराक्रमाची प्रेरणा देत म्हणतात —

**स्फूर्तीचा तुमच्या पिढ्यांस पुढल्या साक्षी कवी होइल !**

'काव्य कोणाचें ?' असें रसिकाने विचारलें तेव्हा 'माझें नाही' असें केशवसुतांनी सांगितलें. त्यावर तो मार्मिक सरळ म्हणाला—

**"काव्य लिहिलें हें सत्य तूं असुन**
**"नव्हे माझें हें–नव्हे तें" म्हणून**
**सांगसी, तर परकीय कल्पनांतें**
**तुवां घेउनि योजिलें, गमे मातें."**

हा अभिप्राय महत्त्वाचा म्हणून त्यावरील उत्तरहि महत्त्वाचें.

**" शारदेने जो मंत्र दिला कानीं,**
**तसें लिहिलें मीं;—काव्य तिचें मानी ! "**

' जें पृथ्वीवर आणिलें ' असेंहि केशवसुत आपल्या काव्याविषयी उद्गारतात. ' हे अग्ने, कवींचीं स्तोत्रें स्वर्गावरून आलीं आहेत.' असें वेदांत म्हटलें आहेच. ( ३. १. २. ) परंतु शेवटीं काव्याचा हेतु काय ? वेद्वाणी सांगते, "देवसमुदायास प्रेमानेच संतुष्ट करणाऱ्या, कर्मव्यापृत, परंतु निर्लोभ अशा त्या प्रार्थना अग्नीकडे गमन करीत असतात. ( १. ७१. ३.) " आणि केशवसुत लिहितात—

**' करूनि तें दंग मनांत गुंगणें**
**तदीय हा सुंदर हेतु मी म्हणें '.**

असे कवि ज्या आर्यांचे प्रमुख होते, त्यांचें नित्याचें संभाषणहि ' सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयात् ' याच प्रकारचें असणार यांत शंका नाही. वाणीचें महत्त्व वर्णन करतांना वेदांत म्हटलें आहे, " सुपाने सातु शुद्ध केल्याप्रमाणे जेथे थोर लोक काळजीपूर्वक भाषण करतात, अशा ठिकाणींच मित्र मैत्री जोडतात. अशा लोकांच्या वाणींत कल्याणकारण ( पद्धत ) लक्ष्मी वास करीत असते. ( १०. ७१. २. ) " " हे वाग्देवते, तूं आम्हांस संपत्ति दे, " अशा त्यांच्या प्रार्थना असत. त्या काळाशीं आजची तुलना केली म्हणजे केशवसुतांप्रमाणेच म्हणावेंसें वाटत नाही काय ?

**वाग्देवी गे ! दे शब्दांतें**
**भोवऱ्यांत या फेकुनि, त्यांतें;**
**जरा जाउं दे निजधामातें,**
**नरें मळविलें अहह ! तेज तें पूर्वीं होतें जें त्यांत !**

विचारांचे भोवरे निर्माण व्हावेत आणि त्यामुळे जीवन–मंथन व्हावें, अशी त्यांची तळमळ होती. तिच्यांतूनच हे शब्द बाहेर पडले. खरोखरच, आर्यांचें तेजस्वी जीवन मनांत आणलें असतां, माणसाने स्वतःला किती हीन करून घेतलें आहे, असा दुःखाचा उद्गार आपल्याहि तोंडून आपोआपच बाहेर पडत नाही काय ? आणि ज्या पुण्यभूवरतीं ही थोर परंपरा येथील मानवांनी त्या दिव्य गायनाने स्वर्गाला आवाहन करून खाली स्थापन करावें म्हणून

निर्माण झाली, त्याच ठिकाणीं त्याच भूमीच्या पुत्रांनी आपलें रूप न ओळखतां आणि मग त्याच बुद्धीने आपल्या भूमीचेंहि स्वरूप न लक्षांत घेतां तिला लत्ताप्रहार करून केवळ काल्पनिक सुखाच्या मागे लागावें हें तर किती विलक्षण खेदजनक ! उच्च विचार करणाऱ्या माणसाचे पाय जमिनीला टेकायला नकोत काय ? पण याउलट त्याने जमिनीला लाथाडावें ना ! या दुःखाने व्याकुळ होऊन केशवसुत निःश्वसितें टाकतात—

**तेव्हापासूनि ही धरा झुरतसे ! माते ! चुकी जाहली !**
**स्वर्गा ! तूंहि अम्हां क्षमस्व सदया !–ये खालता भूतलीं—**
**ये बा ! आणिक या धरेस अगदी देऊं नको अन्तर !**
**आहे तूजवरी तसेंच बसलें स्वर्गा ! तिचें अन्तर !**

केवढा हा दिव्य प्रणय ! केवढी भव्य तो पाहण्याची मनीषा ! आणि केवढी ती स्वतःची चूक नसतांना कवि या नात्याने सगळ्या दोषी मानवाच्या दोषाचें खापर आपल्याच डोक्यावर घेऊन त्याच्याच भल्यासाठी क्षमायाचना करण्याची वृत्ति ! केवढा मानवतेवर विश्वास ! केवढा जगाच्या भवितव्याविषयीचा आशावाद ! ‘ कांट्यांवांचुनि गुलाब नाही ’ हे उद्‌गार अशाच कवीच्या तोंडीं शोभत नाहीत काय ? ‘ काय निराशा असे बरें ? बुजग-बाहुलें जगांतलें ! ’ असे उद्‌गारहि त्यांनीच काढावेत !

केशवसुतांचा हा दृढ विश्वास पाहिल्यावर ती अढळ अमृतपरंपराच त्यांच्या तोंडून बोलत आहे असें वाटतें. त्यांच्या चित्तवृत्तीला या परंपरेचें अधिष्ठान लाभलें. पण ही परंपरा त्यांनी केवळ तटस्थपणें आकलन करून घेतलेली नव्हती, तर तिचा साक्षात्कारहि त्यांना झाला होता. केशवसुतांचें बोलणें प्रचीतीचें आहे, असें त्यांचें काव्य वाचून सहजच मनांत येतें. ऋषींना, संतांना, कवींना येणाऱ्या कांही विलक्षण अनुभवांचा विचार मन करूं लागलें की प्रा. माटे ‘श्रीरामदासस्वामींचें प्रपंचविज्ञान ’ या ग्रंथांत तुकारामबावांच्याविषयी जसें लिहितात तसेंच वाटल्यावांचून राहत नाही. “ कांही काळपर्यंत आपण बरोबरच चालतों, बोलतों. पुढे आपण थांबतों, पण बावा पुढे चालले आहेत हें स्वच्छ दिसतें. कांही वेळाने बावांचें केवळ अंधुकच दर्शन होत राहातें आणि शेवटी ते इतके दूर जातात की,‘ यतो वाचो निवर्तन्ते ’ हा जो परमार्थीतील श्रेष्ठ अनुभव तो आपल्याला तुकाराम-

बावांच्या या संगतींत प्रत्ययास येतो, आणि आपले डोळे निराशेने परत फिरतात. ”

—“ **कांही सुन्दर देखिलें खचित मीं, यामाजि शंका नसे !**
**हा ! हा !—हे जर सर्व भास धरतां येतील मातें, तर**
**पृथ्वीचा सुरलोक कीं बनवुनी टाकीन मी सत्वर ! ”**

—‘ **दिक्कालासहि अतीत झालों;**
**उगमीं-विलयीं अनन्त उरलों;**
**विसरुनि गेलों अखिलां भेदां ’**

—‘ **प्रत्यक्षांतुनि तें परोक्षीं शीघ्र मला नेतें**
**तेथे स्वच्छंदें विचरतां मोद मनीं कोंदे; ’**

अशा प्रकारचें केशवसुतांचें काव्य वाचतांना तें सुदूर तारकेप्रमाणे उज्ज्वल पण अंधुक आहे असेंच मनांत येतें. पण केशवसुतांचे हेहि विचार वैदिक परंपरेला धरूनच आहेत, असें दिसतें. सृष्टींत कांही दिव्य भास होतात, पण ते आपला प्रभाव दाखवून झटकन् लोपून जातात, ते सुंदर असतात, त्यांयोगें जीवन पूर्णपणें बदलून, सुधारून उंचावतां येईल, असें ते म्हणतात. म्हणजेच, सृष्टींतील ( सृष्टि या शब्दांत निसर्ग, मानव, दृश्य, अदृश्य या सर्वांचा अंतर्भाव होतो असें दिसतें ) सत्य, ऋत, हें अतिशय सुंदर असतें आणि त्यामुळे जीवन शिव, मंगल बनतें, असेंच नाही काय ? सत्यामुळे ज्ञान, सौंदर्यामुळे कला आणि मांगल्यामुळे धर्म मिळतो. या त्रयीचा उगम वेदांत आहे आणि ही त्रिमूर्ति एकच आहे, हें आपण पाहिलेंच. अशा या तत्त्वाची स्फूर्ति झाल्यावर सृष्टीशीं आपण एकरूप झालों आहोंत असें वाटून मनांत आनंद कोंदणें हें स्वाभाविकच. याच श्रेष्ठ आनंदाचें वर्णन ‘ झपूर्झा ’ या कवितेंत केलेलें आहे. माणसाला जेव्हा ध्येयाची ओढ लागते तेव्हा त्याच्या सुप्त शक्ति प्रकट होतात आणि त्यांच्या प्रभावापुढे नेहमीच्या सामान्य वृत्ति लुप्त झाल्यासारख्या वाटतात. त्या ध्येयाशिवाय त्याच्या मनांत दुसऱ्या कशाचीहि आवड राहत नाही आणि दुसऱ्या कशाचा विचार त्याच्या मनांत येत नाही. सामान्य गोष्टींतच गुंतून राहणाऱ्यांना हें कळणार नाही. ते अशा ध्येयवेड्यांना हसणार. सृष्टीचें रहस्य शोधण्याचें ध्येय स्वीकारलेल्यांनी अज्ञातामध्येच उडी घेतली पाहिजे.

सृष्टीचीं तत्त्वें शोधण्याची वृत्ति कांहींना उपजत लाभते. पण त्या सत्य तत्त्वाचें सौंदर्य आणि मांगल्य जे लक्षांत घेतील त्यांनाहि तें शोधण्याचें कार्य करतां येईल. ती त्रिमूर्ति त्यांना स्फूर्ति देईल. सृष्टींतील मूलतत्त्वांची संगीतमय क्रीडा चालू आहे. तें सत्य, ऋत, ओळखणें हेंच ज्ञानाचें कार्य. तें सुंदर तर आहेच; पण हें मनावर ठसवायचें असेल तर, तें सत्यच सुंदर आहे, मंगल आहे, ज्ञान–धर्म–कला एकच आहेत, हा मंत्र जपत राहा. सृष्टींत प्रेम आहे, हर्षमय नृत्य आहे, त्यांतून खपुष्पें मिळतात म्हणजे अपूर्व गोष्टी घडतात. त्या सृष्टीच्या मूल रहस्यापर्यंत जायचें असेल, तो अवर्णनीय आनंद पाहायचा असेल, तर सत्य तेंच सौंदर्य तेंच मांगल्य, म्हणजेच ज्ञान तीच कला तोच धर्म, उद्बोधन म्हणजेच मनरंजन म्हणजेच शाश्वत शांति हा विचार ध्यानांत घेऊन विवेकाने वृत्ति एकवटून दंग व्हा! अशा रीतीने सृष्टीच्या अमृतध्वनींतूनच झपूर्झाचा प्रत्यय येतो. केशवसुतांच्या हातून जेवढी काव्यरचना झाली आहे तेवढी लक्षांत घेतां झपूर्झा हा तिचा कळस आहे, असें म्हणावेंसें वाटतें.

सृष्टीचे अमृतध्वनि ऐकण्याची, त्यांत दंग होण्याची आणि त्या अर्थाचे बोल इतरांनाहि दाखवण्याची सनद केशवसुतांना लाभली होती. त्यांच्या उदात्त बुद्धीला अलौकिक असें जें कांही तें तें हवें होतें. उदात्त बुद्धीची युति झपूर्झाशीं निरंतरपणें व्हावी, समसमा संयोग व्हावा, त्यांचा चुकूनहि वियोग होऊं नये असेंच कुणाहि कविवृत्ति समजणाऱ्याला वाटणार नाही काय? पण पत्नीचा पतीवर असतो तसा उदात्त बुद्धीचा या श्रेष्ठ तत्त्वावर हक असूनहि तिला तें मिळूं नये ना! तोच तिचा राम! तो गेल्यावर तिला संसाराचें काय! उदात्त बुद्धीला झपूर्झासाठी झुरत कां पडावें लागतें? झपूर्झाचें दर्शन होतांक्षणींच प्रथम उदात्त बुद्धीला धक्काच बसला, आणि कांही कळत आहे की नाही हेंच कळेना. कळत तर होतें, अगदी नवीन, सुंदर,... पण त्याहूनहि पुष्कळच अधिक असें कांही तरी!

**काय म्हणावें या स्थितिला?—**
**झपूर्झा! गडे झपूर्झा!**

त्याच क्षणीं उदात्त बुद्धीला कळून चुकलें की आपला जन्म झपूर्झासाठीच! या प्रत्ययाने तिची पातळी उंचावली आणि तिला व्यर्थी अधि-

कच अर्थ वसतो हें दिसूं लागलें; आणि मग ती बोलूं लागली. ज्यांची पातळी अशी उंचावलेली नाही, ज्यांना सृष्टीच्या रहस्याची ओढ नाही ते हसूं लागतील असें तिला वाटूं लागलें. पण झपूर्झाच्या प्रेमाने तिला निर्भय केलें. ती त्या नांवाचा जप करतां करतां नृत्य करूं लागली आणि गाऊं लागली—

### झपूर्झा ! गडे झपूर्झा !

हिचेंच वर्णन याआधी केशवसुतांनी ' कल्पकता देवी ' म्हणून केलें नाही काय ? पण या बुद्धीने ही खरी जाणीव होण्यापूर्वी अजाणपणें सामान्य संसार मागून घेतला ! दिलें काय आणि घेतलें काय ! मग साहजिकच देह एके ठिकाणीं आणि चित्त दुसऱ्या ठिकाणीं अशी द्विधा स्थिति झाली. पण झपूर्झाचा भास निसर्गाच्या सान्निध्यांत पुनःपुनः होऊं लागल्याने शेवटी लोकलाजहि दूर पळाली. उदात्त बुद्धि आणि झपूर्झा यांची गाठ पडल्यावर थक्क करणारे शब्द जन्मणार, हें काय सांगायला हवें ? आणि तसें ऐक्य होऊं लागलें तर कुणी कांही हातचें ठेवील काय ? म्हणूनच उदात्त बुद्धीची तगमग चालू आहे. तसें ऐक्य न झाल्याने चुकल्यासारखें वाटून उदात्त बुद्धि सर्वत्र झपूर्झाचा शोध घेत वणवण हिंडत आहे !

याच उदात्त बुद्धीने केशवसुतांना नादीं लावलें होतें आणि वेडें केलें होतें. उदात्त बुद्धीची झपूर्झाशीं निरंतर युति व्हावी, सृष्टीचे अमृतध्वनि ऐकावेत, ईश्वरेचें स्तन्य लाभावें, म्हणूनच जगणाऱ्या ऋषींना आणि संतांनादेखील केवढी तळमळ लागून राहिली होती ! पण तसें जीवन पात्रता असूनहि जगतां न आल्यास श्रेय हरपलें असें वाटून त्या दुःखाने प्राण फुटूं पाहतो की काय असें वाटावें, आणि मग इच्छित न मिळे कांही म्हणून जग भिकार वाटून, सृष्टिकर्त्याला सर्वस्व अर्पण करण्याची प्रेरणा व्हावी, हें सुसंगत दिसतें असें म्हणावेंसें वाटत नाही काय ?

केशवसुतांच्या उदात्त बुद्धीला जीवनांतील हा श्रेष्ठतम आनंद हवा होता. म्हणूनच त्याच्या प्राप्तीकरता ती झुरत पडली होती, हें अगदी उघड नाही काय ? पण ' हरपलें श्रेय ' ही कविता ' मूळ ' इंग्रजी कवितेचें ' रूपांतर ' आहे हें गृहीतच धरून पाहणाऱ्यांना ' मूळची ' कविता ' वरच्या दर्जाची ' आणि ' अधिक तत्त्वज्ञानात्मक असूनहि अर्थप्रतीतीस अधिक सुलभ '

वाटावी, हें सरळच आहे. पण 'मूळ' इंग्रजी कवितेवरून या कवितेकडे पाहिलें असतांहि, या कवितेचा अर्थ उमगत नाही, स्पष्ट होत नाही, असें या टीकाकारांना कबूल करावेंच लागलें आहे! आणखी असें की, केशवसुतांना मुलांचें प्रेम होतें, त्यांच्या गोड मनोवृत्तीचें त्यांना कौतुक वाटत होतें, हें खरें; पण ज्या 'उदात्त बुद्धीला संसारांत राम नाही ती अलौकिकासाठी झुरणारी बुद्धि' बाल्यांतील आनंदासाठीच झुरत होती, असें म्हणतां येईल काय? बाल्यांतील आनंदाचें महत्त्व मान्य करूनहि, जीवनांतील श्रेष्ठ आनंद तोच, तेवढाच, असें कुणाला वाटेल? लहानपणीं किंवा आयुष्याच्या प्रारंभीं अजाणपणांत सुख होतें, तें जाणिवेने नष्ट झालें,त्यामुळे लहानपणाचें सुख नाही, प्रौढपणाचें सुखहि नाही, अशी विलक्षण अवस्था झाल्यानेच केशवसुत इतके अस्वस्थ झाले आहेत. अजाणपणें जें मागितलें तें मिळालें, पण त्यासाठी भलतीच किंमत द्यावी लागली. निज श्रेयाची जाणीव लवकर झाली असती आणि ही किंमत त्यावर खर्च केली असती, तर जें मिळालें असतें तें आता कसें मिळणार, हें त्यांचें दुःख आहे. रोजच्या कार्यक्रमांत गुंतून राहायचें म्हटलें तरी आता जाणिवेची वेदना होत राहतेच. घरांतल्या कामांत व्यग्र असतां झरोक्यांतून किरणशलाका येतांच भोवतालचा अंधार आणि तें तेज जाणवतें, मग हातांतील कामांची आबाळ जाचते पण त्याचें वेड लागतेंच, असें केशवसुत सांगतात. पुढे, निसर्गांत तो आनंद दिसतो असें स्पष्ट वर्णन आहे. निसर्गाचें सरळ साधेंपण, त्याची नैसर्गिक भव्यता उदास, बालाच्या मनांत भरणें शक्य आहे काय? निसर्गानंद आणि बाल्यानंद एकच काय? बाल्यानंदासाठी मुलांचे मेळावे सोडून कवि निसर्गात विजनीं हाका कुणाला मारतो? त्रिखंड कां धुंडतो? बाल्याच्या आनंदाची केवढीहि परमावधि झाली तरी त्यांतून—

**' एक शब्द बोलेन जरी**
**सकलां कुण्ठित करिन तरी ! '**

असें काय बाहेर पडणार की ज्यासाठी 'पडाव्या जिवलगांसी तुटी। सर्वस्व अर्पावें शेवटीं। प्राण तोही वेचावा' या भावनेने कवि सिद्ध झाला आहे? बाल्यांतील मनोवृत्ति कौतुकास्पद खरी, पण तिचा वयाबरोबर विकास व्हायला हवा आणि सृष्टीचें रहस्य जाणण्याची जिज्ञासा, तें शक्य तितकें कळ-

ण्याची पात्रता आणि त्याचें रसग्रहण करण्याची वृत्ति यांची उत्तरोत्तर होत जाणारी वाढ तिला लाभायला हवी. केशवसुतांना तर याहूनहि मोठ्या आनंदाची ओढ आहे — तो झपूर्झा, हें आपण पाहिलेंच. त्याचें दर्शन झालें पण निरंतर लाभ झाला नाही, एवढेंच नव्हे तर 'मन चिंती तें वैरी न चिंती' या नात्याने 'तो हरपला' असें त्यांच्या प्रसंगीं प्रखर होणाऱ्या पण मुळांत शिरीषकोमल असलेल्या मनाने घेतलें आणि मग—

**अशी आगळी**
**परी बावळी**
**आहे दुबळी**

अशी त्यांच्या बुद्धीची अवस्था झाली! पुढे काय झालें असतें हें पाहावला रात्र आणि दिवसांच्या हातांनी अधिकाधिक कवटाळणाऱ्याने आणि आकार नष्ट करणाऱ्याने त्यांना ठेवलें नाही. त्याच गूढ स्वरूपांत ते विलीन झाले!

केशवसुतांनी इंग्रजी काव्य वाचलें नव्हतें असें नाही. त्यांची मूळची वृत्तीच चौकस, रसिक, सर्वसंग्राहक आणि तिच्यावर पुनः वैदिक विश्वप्रेमाचे संस्कार झालेले! त्यामुळेच त्यांनी 'ईश्वराचा ग्रंथ', 'जगामधी या तुला कशाला परमेशें धाडिलें' अशा वैदिक विचारांना सदृश असणाऱ्या कविता टिपल्या. त्यांतहि ह्यूगोसारख्यांचा त्यांनी फक्त आकार घेतला. 'वैदिक परंपरेंतील स्वयंभू कवि' या नात्यानेच त्यांनी इंग्रजी काव्याकडे पाहिलें, आणि सुनीत हा प्रकार मराठींत रूढ केला. इंग्रजीवरून घेतलेल्या त्यांच्या कांही कविता मुळांपेक्षाहि सरस वाटतात, याचें रहस्य काय? इंग्रजी काव्य समोर दिसत असतां त्यांतील चांगला भाग न निवडणें हेंच वैदिक परंपरेला सोडून झालें असतें! पण त्याचें तारतम्य अगदी सुस्पष्ट आहे. केशवसुतांच्या एकंदर कवितांत भाषांतरित कविता आधी किती आणि त्यांत वैदिक परंपरेंत न बसणाऱ्या किती, हा प्रश्नच आहे! वैज्ञानिक दृष्टिकोन, मानवतावादी विचार-सरणी, कलाप्रेम अशा जीवनव्यापी गोष्टी आणि याहूनहि थोर गूढ पण जाणवणारें असें कांही तरी 'नैसर्गिकपणें'च वैदिक परंपरेंत असतांना ती सोडायची कल्पना केशवसुतांना स्वप्नांतदेखील शिवली असेल असें वाटत नाही. दुसरा कसलाहि विचार न करतां, केवळ जीवनास आवश्यक अशा गोष्टींचाच संग्रह करायचा असें म्हटलें तरी सत्यव्रत, निःपक्षपाती अशा माणसाला

वेदांचा विचार न करून चालेल असें वाटत नाही. पाश्चात्य लोकां त्यांचें महत्त्व कसें वाटतें तें आपण पाहिलेंच. भारतीय लोकांच्या रक्त वैदिक परंपरा आहे, हेंच खरें. भारताचें सबंध आध्यामिक जीवन वे प्रभावीपणें व्यापलें आहे असें रॅगोजिनदेखील म्हणतो. वेदांचा अ केल्याशिवाय मराठी वाङ्मयाचा अभ्यास होणार नाही, हें टळटळीत दुपा सूर्यासारखें स्पष्ट आहे. मराठी काव्याचा प्रवाह आपल्या काळांत संत अगदी शुद्ध राखला. केशवसुतांनीहि आपल्या काळांत तेंच केलें. त्य कांही इंग्रजी काव्यलेखन केलें म्हणतात. संतांनीहि परभाषांत रचना केले आहेत. एवढेंच कशाला, 'मी मराठी भाषेचा शिवाजी आहें' हे श प्रथम कोणत्या भाषेंत आले, हेंहि सर्वश्रुत आहे! केशवसुतांचें महत्त्व स्थान अशा रीतीने सिद्ध होत आहे. पण, केशवसुतांची बुद्धि ती का वृत्ति ती काय, शिक्षण तें काय, असें कित्येक विद्वानांना वाटतें! त्य बंधु कुशाग्र बुद्धीचे पण हा 'कुशा' मात्र सामान्य, असें मानणें ज्यां रुचेल त्यांनी खुशाल मानावें! जणू कांही इंग्रजी परीक्षापद्धति आदर्श हो आणि तिच्यावर त्यांनी आपली बुद्धि घासून दाखवायला हवीच होती स्वतः केशवसुतांना हें मत कळलें असतें तर ते मनांत हसल्यावांचून खा राहिले नसते! कारण—

**डोळ्यांला बघण्या तसें शिकविणें कानांस ऐकावया,**
**हें हास्याई जसें, तसें पढविणें शाहीर आहे तया!**

केशवसुतांना आपल्या आईवडिलांविषयी केवढी पूज्य भावना होती, उघड आहे. त्यांचे वडील शिक्षक आणि आई धार्मिक, भाविक होती. यांनी केशवसुतांच्यावर संस्कार केले ते कोणत्या संस्कृतीचे? प्रौढपणींहि त्यांचे आशीर्वाद ते कां मागतात? आणि त्यांची आठवण होऊनच—

**'तान्हा बाळचि राहतों तर किती तें गोड होतें असें!'**

असा गहिवर त्यांच्या चित्तांत येतो. केशवसुतांच्या शैशवप्रेमाचा उगम कुठे पाहायचाच असेल तर तो हा संदर्भ पाहून केशवसुतांना जी रामकथा प्रिय तिच्यांतील 'गेले ते दिवस' या उद्गारांच्या संदर्भातच पाहायला नको काय? आणि, केशवसुतांना आपल्या संचारांत इंग्रजी काव्य वाचायला

मिळालें असणें अधिक शक्य आहे की भारतीय संस्कृतीविषयक लिखाण मिळालें असणें अधिक शक्य आहे ? 'गोल्डन ट्रेझरी 'पेक्षा त्यांचें इंग्रजी वाचन फारसें नसावें, असें कांही टीकाकारच म्हणतात ! आणि वैदिक संस्कृतीचें प्रतीक म्हणजे सोमरस. तोच केशवसुत मागत आहेत. सोमाचीं निरनिराळीं वर्णनें वाचून वेदकालींच तो प्रतीकरूप पावला होता, असें वाटतें. परंपरेंतूनच त्याचा जो शेष आला आहे, तो त्यांना हवा आहे. कारण सोम-प्राशन केल्यावरच दंग व्हायचें आणि व्योमसागरावर जायचें हें ' होउनिया मग दंग मनीं ' आणि ' कलशीची मग करुनी नौका ' या शब्दांवरून स्पष्ट आहे. सोमाचा थोडासा भागच काय, त्याचें स्मरणदेखील स्फूर्ति देण्यास समर्थ आहे, हें केशवसुतांना पूर्णपणें कळलें होतें. पण असें असूनहि त्यांची परंपरे-विषयीची भावना मुळींच अंध नाही. अंध माणसाला वैदिक परंपरेची खरी भक्ति करतां यायचीच नाही !

मराठी वाङ्मयाच्या या अमृतपरंपरेचा, वैदिक संस्कृतीचा, सृष्टीचा विचार मन करूं लागलें असतां, कालदेखील ज्याच्या दिव्यत्वाला नमन करतो तो निसर्ग चिरतरुण कसा आहे, चिररुचिर कसा आहे, त्याच्या सन्निध निवास बरा कसा आहे, हें ध्यानांत येतें. पण मन मग ' सिंहाव-लोकन 'हि करतें, ' फुकट दवडलेले तास 'हि आठवतात, आणि जगाविषयी उदासीन अशी सृष्टीशीं तन्मयता आपल्यापाशी नाही असे अनेक विचार मनांत येऊन, त्या निसर्गसिद्ध जीवनांत आणि आपल्यांत केवढी रुंद दरी निर्माण झाली आहे असें वाटून, ती दिव्य शांति केव्हा लाभणार, असें केशव-सुतांप्रमाणेच मनांत येत नाही काय ? निसर्गसिद्ध जविन म्हणजे निसर्ग, सर्व विश्व, ज्या कारणासाठी निर्माण झालें आहे, तें कारण ओळखून त्यांत आपली कामगिरी कर्तव्यतत्परतेने पार पाडणें, हें अक्षरशः सूर्यप्रकाशासारखें स्वच्छ आहे. हेंच अमृतपरंपरा उच्च रवाने सांगत आहे ! सूर्यचन्द्रादि विश्वाचे प्रतिनिधि खपुष्पें खुडत असतात, म्हणजे अपूर्व प्रयोग करीत अस-तात असेंच नाही काय ? मानवानेहि असेंच कांही तरी केलें पाहिजे. ' कांही तरी ' म्हणजे काय हें ज्याचें त्याने ठरवावें !

केशवसुत हेंच आवाहन करतात—

कल्पनेंची मग करुनी नौका व्योमसागरावरि जाऊं
उडुरत्नें या गरिब घरेला तेथुनि फेकुनिया देऊं !

केशवसुतांची कविता वाचतांना त्यांचे सच्चे चेले, आणि केशव संप्रदायांत व मराठी वाङ्मयांत मोलाची भर टाकणारे कवि गोविंद यांच्या पुढील ओळींची स्मृति होणें हें सूर्यांबरोबर चन्द्राचीहि आठवण व्ह इतकें नैसर्गिक आहे !—

शिवरायाच्यामागे आम्हीं लाल महालीं फिरणें
तसेंच तुमच्यामागे आम्हीं नवीन कविता करणें
असेंच कांही कांही करुनी जीवित त्याला गणणें
'गोविन्दाग्रज' म्हणे असें हें आम्हां लाजिरवाणें !

शब्दप्रभु गोविंदाग्रजांनी असें म्हणावें तिथे मनांत येतें, आपण का बोलावें !

—

[ ‘ केशवसुत ’ या प्रबंधांत दिलेले वेदांतील उतारे श्री. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, श्री. रा. वि. पटवर्धन, श्री. रा. गो. कोलंगडे, यांनी केलेल्या भाषांतरांतून घेतले आहेत. केशवसुतांच्या काळीं मराठींत प्रसिद्ध असलेल्या वेदांसंबंधीच्या ग्रंथांची यादी प्रा. गं. बा. सरदार यांच्या ‘ अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका ’ या ग्रंथांतून घेतली आहे. रॅगोजिनच्या ग्रंथाचें आणि त्याचें स्वतःचें नांव पुढीलप्रमाणे :–

VEDIC INDIA
AS EMBODIED PRINCIPALLY IN
THE RIG–VEDA
BY
ZENAIDE A. RAGOZIN. ]